'प्रकाशन प्रतिभा' हे पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर आजच्या या प्रकाशनातील अप्रकाशित साहित्य माझ्याकडे आपण होऊन चालत आले "तुमचे 'प्रकाशन प्रतिभा' वाचून मला विश्वास वाटला की माझ्याकडे पडून असलेल्या साहित्याची निगा व शोभा तुमचें प्रकाशनच वाढवू शकेल" असे उद्गार तें साहित्य माझ्या स्वाधीन करणारांनीं काढले, व कित्येक दिवस आदर पूर्वक जपून ठेवलेलें हें 'धन' त्यांनीं माझ्या स्वाधीन केलें

हें अप्रकाशित साहित्य चाळून पाहत असताना त्यांतील ओजस्वी वैभव पाहून, माझे डोळे व मन दिपून झालें तें बाड मी श्री. अत्रे ह्यांच्याकडे घेऊन गेलों त्यांनीं तें साहित्य आस्थेनें व बारकाईनें पाहिलें ते पाहून त्यांनी आपल्या स्वतःच्या खास बासनातलें गडकरी यांचें अप्रकाशित साहित्य वेचून काढलें व तो बहुमोल ठेवाहि या प्रकाशनासाठीं त्यांनीं दिलदारपणें माझ्याकडे दिला

'अप्रकाशित गडकरी' या प्रकाशनाला माझ्या कल्पनेनुसार मी घाट देत असताना मला वाटू लागलें की, तुटक पण विविध, वैचित्र्यपूर्ण, व कलानिर्मितीच्या प्रक्रियेचा मागोवा काढण्याच्या दृष्टीनं अपूर्व अशा या साहित्य-कणाच महत्त्व कोणा तरी अधिकारी व्यक्तीनें विशद करून सांगणें आवश्यक आहे स्वाभाविकच हा अधिकार श्री अत्रे ह्याचाच! मीं त्याना या प्रकाशनाला प्रस्तावना लिहिण्याची विनती केली व ती त्यानीं मोठ्या प्रमन्न उदारतेनं मान्यहि केली

या सर्व योगायोगान सकलित झालेलं हें अपूर्व प्रकाशन आज मी रसिकाना सहर्ष सादर करीत आहे श्री अत्रे याची प्रदीर्घ प्रस्तावना व या पुस्तकांतील प्रत्येक पान वाचकाच्या रसिकतेचें पूर्ण समाधान करील असेंच आहे

या प्रकाशनाच्या साहित्याची इतर जमवाजमव करीत असताना व सतत आठ आठवडे प्रस्तावनेसाठीं अत्रे ह्यांचा पाठलाग करून त्याच्याकडून प्रस्तावना लिहून घेत असताना मीं अमूप आनद अनुभवला आहे! तोच आनद वाच कांच्याहि वांट्याला हे पुस्तक वाचून यावा हीच माझी उत्कट इच्छा!

माझ्या ज्ञात व अज्ञात अशा अनेक स्नेह्यानीं या प्रकाशनाला अनेक प्रकारच साह्य केलें आहे. त्याच्या या अमोल साहाय्याबद्दल मी सर्वांचा सदैव ऋणी आहे.

ह. वि. मोटे

# अनुक्रम

## अपूर्वा

गडकऱ्यांचें कर्तृत्व जसें अलौकिक, तसें त्यांचें व्यक्तिमत्त्वहि लोकविलक्षण. म्हणून अवघ्या चौतीस वर्षांच्या आयुष्यात एखादा दिग्विजय मिळवून ते गेले. *त्यांना जाऊन आतां बेचाळीस वर्षें झालीं, तरी देखील* अजून त्यांची कीर्ति पहिल्याइतकीच प्रफुल्लित आणि टवटवीत आहे. त्यांच्या वाङ्मयाबद्दल आणि जीवनाबद्दल विचार करतांना डोळे अद्याप दिपतात. किंबहुना, त्यांच्या अवसानानंतर जसजशीं जास्त वर्षें लोटताहेत, तसतसें त्यांच्याबद्दल आकर्षण जास्त जास्त वाढत चाललें आहे. महाराष्ट्रानें त्यांच्या गुणांचें जेवढें कोडकौतुक केलें तेवढें कोणत्याहि मराठी लेखकाचें केलेलें नाहीं. त्यांच्या काव्यानें, नाट्यानें आणि विनोदानें महाराष्ट्राला अक्षरशः वेड लावलें. त्यांच्या देदीप्यमान भाषेनें आणि वैशिष्ट्यपूर्ण शैलीनें शारदेच्या अंगावर नवे नवे अलंकार चढवले आणि मराठी साहित्यात नवें युग सुरू केलें. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं मराठी भाषेला सामर्थ्य दिलें, तर गडकऱ्यांनीं मराठी भाषेला सौंदर्य दिलें.

गेल्या चाळीस वर्षांत गडकऱ्यांच्या वाङ्मयावर अनुकूल आणि प्रतिकूल इतकें लिहून झालें आहे कीं, आतां त्यांच्या वाङ्मयीन गुणदोषांबद्दल फारसें कांहीं लिहिण्यासारखें उरलेलें आहे असें वाटत नाहीं. गडकऱ्यांनीं जें जें लिहिलें आहे, तें जसें प्रसिद्ध झालेलें आहे, तसें त्यांच्याबद्दल ज्यांना ज्यांना कांहीं लिहितां येण्यासारखें होतें, तें त्यांनींही लिहून टाकलें आहे. अशा परिस्थितींत 'अप्रकाशित गडकरी' ह्या मथळ्यानें प्रसिद्ध होत असलेलें हें पुस्तक बघून गडकरीभक्तांना आश्चर्याचा धक्का बसल्यावाचून राहणार नाहीं

डोळे खवारून आणि भुवया उचावून ते विचारतील की, 'अप्रकाशित गडकरी' ही काय भानगड आहे ! आता गडकऱ्यांचे काय प्रकाशात येण्याचे राहिलें आहे ! तथापि, पुस्तकाचा केवळ मथळा वाचून चकित झालेले वाचक प्रत्यक्ष पुस्तक वाचून तर अक्षरशः थक्क होतील ह्याविषयीं आमच्या मनांत यत्किंचित शंका नाहीं. कारण, मराठी भाषेंतच काय पण कोणत्याहि भाषेंत अशा तऱ्हेचें पुस्तक प्रसिद्ध झालें असेल असें आम्हाला वाटत नाहीं.

'अप्रकाशित गडकरी' या पुस्तकांत गडकऱ्यांचें वाङ्मय असे फार थोडे आहे. पण तें वाङ्मय ज्यांतून अंकुरलें आहे, त्या तेजस्वी बीजांचे कांहीं नमुने ह्यांत पाहावयाला मिळतील. त्यांचें अमर वाङ्मय ज्या प्रतिभेच्या खाणींतून जन्माला आलें, तिच्या तेजस्वी अंतर्भागाचें ज्वलन्त दर्शन या पुस्तकांत घडेल. इतकेंच नव्हे तर त्या खाणींतून बाहेर न पडलेलीं अशीं स्फुट विचारांचीं आणि कल्पनेचीं नवनवोन्मेषशाली रत्नें या पुस्तकांत इतस्ततः विखुरलेलीं आढळतील. एखादा रत्नकार किंवा सुवर्णकार आपल्या कलागृहांत अलंकार घडवीत असतांना रत्नांचे वा सुवर्णाचे कण जसे आजूबाजूला उडतात, त्याप्रमाणें गडकऱ्यांच्या अमर वाङ्मयाची निर्मिति होत असतांना त्यांच्या प्रतिभेंतून विचारांचे वा कल्पनेचे जे जे स्फुलिंग उडाले, ते ते या ठिकाणीं एकत्रित केलेले पाहावयास मिळतील. सारांश, गडकऱ्यांसारख्या एका प्रतिभाशाली लेखकाच्या अंतर्मनाचें प्रथमच दर्शन घडविणारें हें एक अभूतपूर्व पुस्तक आहे.

कोणतीहि कलाकृति लेखकाच्या प्रतिभेंतून पूर्ण स्वरूपांत जन्माला आली म्हणजेच ती जगाला पाहावयास मिळते. पण प्रतिभेच्या गर्भाशयांत त्या त्या कलाकृतीचा संभव कसा झाला, तिचा परिपोष आणि विकास प्रतिक्षणीं अन् प्रतिदिनीं कसा होत गेला, वेळोवेळीं तिच्यावर कोणकोणते संस्कार झाले, तिचें संवर्धन करण्यासाठीं कलावंतानें कोणती साधना केली, या सर्व वैचारिक प्रक्रिया आणि अवस्था कांहीं जगाच्या दृष्टीसमोर येत नाहींत वस्तुत, या गोष्टी कवींनीं आणि लेखकांनीं जगाला समजावून सांगायला हव्यात. पण पुष्कळदा त्यांना स्वतःलाच आपल्यास काय होतें आणि कसें होतें हें समजत नाहीं. म्हणून आपलें मानसशास्त्रीय अज्ञान झांकण्यासाठीं त्यांनीं आपल्या लेखनप्रेरणेभोंवतीं दिव्यत्वाचें एक वलय निर्माण करून ठेवलें आहे.

> 'हीं नि घमितें,
> कोण सोडते,
> विचारती भिऊनी त्याला
> पुढें करा मग कर अपुला !'

गडा · अप्रकाशित गडकरी

आपलें काय हीं परमेश्वरी निःश्वसितें आहेत हें एकदा पेऊनच हिंमत असल्यास त्यावर टीका करा, असें एका कवीनें आपल्या टीकाकारांना धमकावलें आहे.

प्रतिभाशाली लेखकाच्या आणि कवींच्या जीवनांत स्फूर्तीला फार मोठें स्थान आहे यांत शंका नाहीं. पण स्फूर्ति हा परमेश्वरी चमत्कार नसून ती भावनात्मक तल्लीनतेची एक अत्यंत गूढतम तरल अवस्था आहे. विशिष्ट वेळीं किंवा विशिष्ट स्थळीं कवीला बाह्य जगाचा आणि आपल्या अस्तित्वाचा विसर पडतो आणि त्याच्या अंतःकरणांत अकस्मात् अननुभूत उर्मि उचंबळते आणि त्या क्षणीं एखाद्या नवीन विचाराचा साक्षात्कार त्याच्या मनाला होतो किंवा एखादी नवीन कल्पना विद्युल्लतेसारखी त्याच्या अंतश्चक्षूसमोरून चमकून जाते. त्यानंतरच महान् कलाकृतीचा जन्म होतो. वाङ्मयाप्रमाणें विज्ञानालाहि हा नियम लागू आहे. सौंदर्याच्या दर्शनानें आणि संगीताच्या श्रवणानें सुखी अंतःकरण देखील हुरहुरूं लागतें.

रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान्
पर्युत्सुकीभवति यत्सुखितोऽपि जन्तुः

हा अमर सिद्धान्त कालिदासानें ज्या अवस्थेंत शोधून काढला, त्याच अवस्थेंत न्यूटनला झाडावरून पडणाऱ्या एका फळांतच सबंध विश्वाचें नियमन करणाऱ्या गुरुत्वाकर्षणाच्या नियमाचा साक्षात्कार झाला.

या गूढ आणि स्वसंवेद्य मानसिक अवस्थेचें वर्णन जास्तींत जास्त समर्पक स्वरूपांत करण्याचा पहिला प्रयत्न केशवसुतांनीं 'झपूर्झा' या कवितेंत केला आहे.

ज्ञाताच्या कुंपणावरून
धीरत्व धरून
उड्डाण करून
चिद्घनचपला ही जाते
नाचत तेथें चकचकते,
अंधुक आकृति तिस दिसती
त्या गाताती
निगूढ गीती
त्या गीतींचे ध्वनि निघती
झपूर्झा गडे झपूर्झा

ह्या 'अपूर्णा' अवस्थेत भासमान होणाऱ्या अधुक आकृति वेळोवळीं जी गूढ गीतें गातात, त्याचा ध्वनि आणि अर्थ शब्दात जेव्हा प्रकट होतो तेव्हाच कलाकृति निर्माण होते. पण हं काम कांहीं सोप नाहीं. त्यासाठीं महान् तपश्चर्या करावी लागते. लेखन ही एक रसायनशाळा आहे. मूळ कल्पनेमध्यें वाचन, अवलोकन आणि चिंतनादि रसायन मिसळून अनुभवाच्या मुशीमध्यें त्याना जेव्हा चांगलें आटवावें, तेव्हा त्यातून चिरतन कलाकृति प्रकट होते. पण हें करताना लेखकाला केवढे कष्ट करावे लागतात, तें 'जावें त्याच्या वशा तेव्हांचि कळे!

ऐकाच्या अतर्मनात प्रवेश करण्याचा योग वाचकाना कचित्‌च प्राप्त होतो. उलट, कोणी तसा प्रवेश करू नये ह्याची ते काळजी घेत असतात. जणु काहीं आपल्या कलेचें रहस्य दुसऱ्याना कळेल ह्याची त्याना भीति वाटत असते. आभाळातून विमान उडत असलेलें किंवा समुद्रावरून जहाज चाललेलं पाहताना आपणाला केवढी मौज वाटते? मग हें विमान उडतें कसे आणि हं जहाज चालत कस हं पाहण्याची साहजिकच आपल्या मनामध्यें जिज्ञासा उत्पन्न होते आणि त्या जिज्ञासेचें समाधान होण्याची त्या त्या वाहनामध्ये सोय असते. विमानाच्या नि जहाजाच्या यत्रगृहात आपण डोकावून पाहिलं की, यत्रसृष्टीतला तो अद्भुत चमत्कार बघून आपण हतबुद्ध होतों. आणि मग विमानाबद्दल आणि जहाजाबद्दल वाटणारा आपला आदर शतपटीन वृद्धिंगत होतो. महान् लेखकाच्या अतर्मनात जर डोकावून बघण्याची आपणाला संधि मिळाली तर आपली तशी अवस्था होईल 'अप्रकाशित गडकरी' ह्या पुस्तकात असा पुष्कळसा भाग आहे कीं, ज्यावरून गडकऱ्याच्या निर्भेळ प्रतिभासाधनाची वाचकांना कल्पना येईल आणि त्याच्या वाङ्मयाकडे पाहण्याची त्याना एक नवीन दृष्टि प्राप्त होईल.

तत्पूर्वी गडकऱ्याच्या व्यक्तिगत जीवनाचा काहीं तपशील समजून घेणे जरूर आहे. गडकऱ्यानीं 'आत्मचरित्र' काहीं लिहिलें नाहीं. त्याचें अधिकृत चरित्रहि लिहिण्याचा कोणी प्रयत्न केला नाही. त्याच्या वाङ्मयात आत्मचरित्रपर उल्लेख जवळजवळ नाहींत असेंच म्हणावें लागत. केवळ त्याच्या प्रस्तावनातून आणि अर्पणपत्रिकावरून त्याच्यासंबंधींची काहीं माहिती गोळा करता येते.

असले पाहिजेत ह्याची कल्पना येते. 'अर्वाचननिर्ते'च्या तळाशी 'फर्ग्युसन कॉलेज' असा स्थळनिर्देश केलेला आहे. खेरीज, ह्या नाटकाला फर्ग्युसन कॉलेजातील तर्कशास्त्राचे प्राध्यापक, त्या वेळच्या महाराष्ट्रामधले एक ख्यातनाम सुधारक आणि गडकऱ्याचे विद्यागुरु गोविंद चिमणाजी भाटे ह्यांनी प्रस्तावना लिहिली आहे. गडकरी हे फर्ग्युसन कॉलेजमधील विद्यार्थी असूनहि त्यांच्यावर त्या कॉलेजातील प्राध्यापकाचा फार लोभ होता आणि त्यांना ते बरोबरीच्या नात्यानें वागवीत असत. हें त्याच आपल्यावरचें ऋण त्या नाटकाच्या प्रारंभीं केलेल्या 'निवेदना'त गडकऱ्यांनीं मान्य केलें आहे. त्याच्याच तळाशीं '१३६ कसबा पेठ' असा आपल्या राहत्या घराचा निर्देश त्यांनीं केला आहे. सदर नाटकामध्यें केशवसुताच्या 'झपूर्झा' आणि बाल कवि ठोमरे ह्याच्या 'आनंदी आनंद गडे' ह्या काव्यामधल्या काहीं पत्ती उपयोजून गडकऱ्यांनीं ह्या उभय कविश्रेष्ठांबद्दल आपला आदरभाव व्यक्त केलेला आहे.

गडकरी हे बहुधा १९०५ सालीं म्हणजे वयाच्या विसाव्या वर्षी मॅट्रिकची परीक्षा पास झाले असावेत. कारण, त्यानंतर त्यांनीं तीन वर्षे 'किर्लोस्कर नाटक मंडळी'तल्या मुलांना शिकविण्याचें काम केलें. पुढें तेथें काहीं मतभेद होऊन १९०८ च्या नोव्हेंबरमध्यें वऱ्हाडातल्या बाळापूरच्या शाळेंत काहीं दिवसपर्यंत त्यांनीं मास्तरकी केली तेथ ते अवघे पधरा दिवस होते. १९११ सालीं पुन्हा त्यांनीं आपल्या उच्च शिक्षणास प्रारंभ केला. आणि फर्ग्युसन कॉलेजात नाव नोंदवलें ह्याच कालखंडात त्यांनीं 'प्रेमसंन्यास' नाटक लिहिलें. १९१२ सालीं वयाच्या सत्ता विसाव्या वर्षी ते प्रीव्हियसची परीक्षा उत्तीर्ण झाले. पुढे त्यांनीं इंटर मीडिएट परीक्षेच्या टर्म्स भरल्या, पण त्या परीक्षेला ते कधींच बसले नाहींत. तेथेंच त्यांच्या महाविद्यालयीन शिक्षणाची इतिश्री झाली

१ जुलै १९१६ रोजीं 'पुण्यप्रभाव' नाटकाचा पहिला प्रयोग मुंबईच्या रंगभूमीवर झाला. पण त्या नाटकाचें पुस्तक पुढे दोन वर्षांनीं म्हणजे १९१८ सालीं प्रसिद्ध झालें. त्या नाटकाच्या प्रस्तावनेंत आपण दहा वर्षांपूर्वी किर्लोस्कर नाटक मंडळीचे एक द्वारस्थ असल्याचें प्राजळपणें त्यांनीं नमूद केलें आहे. सदर नाटक लिहितांना आपणास नारायण हरि घोरपडे, केशवराव रघुनाथ बिनरकर, मल्हारचंद्र वामन धडफळे, विठ्ठल सीताराम गुर्जर आणि चिंतामण गणेश कोल्हटकर या मंडळींनीं निरनिराळ्या तऱ्हेची मदत केल्याबद्दल त्याचे आभार मानले आहेत नारायणराव घोरपडे हे कोल्हा पूरचे एक सधन आणि शौकीन गृहस्थ होते. पुण्या-मुंबईला ते कधा

आले म्हणजे स्वतःच्या खर्चानें ते गडकऱ्यांची सरबराई करीत. त्यांचा उल्लेख पुढें येईलच. पुढें हे गृहस्थ परागंदा झाले. त्यांच्याच आयुष्याचा शेवट कसा झाला हें आजतागायत कोणास माहीत नाहीं.' केशवराव ऊर्फ भाऊसाहेब खिरवडकर हे गडकऱ्यांच्या राहत्या घराचे मालक त्यांच्या समोर राहत. कोणत्याहि महत्त्वाच्या बाबतींत गडकरी त्यांचा सल्ला घेत. (अजून, ते हयात आहेत) भालचंद्र ऊर्फ भाच्यामामा धडफळे हेहि गडकऱ्यांचे आळीकर होते. एंजीनियरिंग कॉलेजांत असतांना ते उत्तम क्रिकेट खेळत. त्यामुळें गडकऱ्यांना त्यांचें आकर्षण वाटे. गडकऱ्यांच्या वाङ्मयाचे ते उत्कट चाहते होते. एवढेंच नव्हे, तर कित्येक बाबतींत प्रसंगी गडकऱ्यांचे ते निकटवर्ती असत. (ते नुकतेच वारले.) गुर्जर आणि कोल्हटकर ह्यांची ओळख सर्वांना आहेच. ह्या मंडळींचे जरी गडकऱ्यांनीं आभार मानले असले तरी गडकऱ्यांच्या नाट्यलेखनामध्यें साहाय्य करण्याची त्यांच्यापैकीं कोणाचीहि विशेष पात्रता नव्हती. केवळ औपचारिक भावनेनेंच त्यांनी हे आभार मानले आहेत. 'पुण्यप्रभावा'चें पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर अवघ्या पांच महिन्यांनीच गडकऱ्यांचे देहावसान झालें. बाकीचीं त्यांचीं नाटकं त्यांच्या मरणोत्तरच रंगभूमीवर आलीं.

'भावबंधन' नाटकाचा पहिला प्रयोग 'बळवंत संगीत मंडळी'नें अकोला येथें १८ ऑक्टोबर १९१९ ला केला. ह्या नाटकाच्या 'मंगलाचरणा'त ज्या आपल्या लेखनगुरूची 'वदुनि त्या श्रीपादपदांप्रति याया यश कार्यांते' असा कृतज्ञतेनें गडकऱ्यांनीं आधींच उल्लेख करून ठेवला होता, त्या श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनाच त्या नाटकाचीं काहीं पदं रचावीं लागलीं आणि त्यांनींच त्या नाटकाची प्रस्तावना लिहिली. ह्या प्रस्तावनेंत "१९१८ चे नाताळांत

गडकरी पुणे येथ अत्यवस्थ असता आता आपण फार दिवसाचे सोबती नाहीत हें त्याना कळून चुकलें असल्यामुळें त्याना त्यावेळीं आपल्या वाङ्मय विषयक संसाराची निरवानिरव चालविली होती" असे कोल्हटकरानीं नमूद केलेलें आहे. ह्या नाटकात घन श्यामच्या तोंडीं "आपल्याला माहितीच आहे की मला गुजराथी चागलेंच येत. जवळजवळ माझी मातृभाषाच गुजराथी आहे" हें जें वाक्य गडकऱ्यानीं घातलेलं आहे तो त्याचा आत्मचरित्रात्मक उल्लेख आहे. कारण त्याचा जन्म गुजरातेंत गणदेवी येथें झाला होता.

१९२१ साली 'वाग्वैजयती' हा गडकऱ्यांचा संपूर्ण कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. त्याला तात्यासाहेब केळकर ह्यानीं प्रस्तावना लिहिली आहे तिच्यात ते म्हणतात की, "गडकरी ह्याच्या व माझ्या वयात बरेंच अतर असूनहि त्याचा व माझा परिचय बराच उशीरा झाला. तथापि, स्नेही या नात्यानें त्याचे माझे जे थोडे दिवस गले त्यांत त्याच्याशीं समाषण हा एक क्वचित् मधूनमधून मिळणारा, पण मिळेल तेव्हा उत्कट आनद देणारा असा विषय होऊन बसला होता. त्याच्या भाषणाच्या विनोदीपणामुळें रंगलेली सभा किंवा रगलेलें नाटक चाललें असता त्याच्या शेजारीं बसणें हें दुर्घट काम वाटे. कल्पनेचा अनिरुद्ध सचार त्याच्या सभाषणातून खरा पाहावयास मिळे. चमत्कृतिजनक व विकृत अशाहि कल्पना लोकाना एकवण्याच्या कामीं गडकऱ्यांइतका धाडसी व निमुर्वतखोर लेखक मराठी मार्गेत झाला नाहीं."

गडकऱ्यांच्या काव्यात आत्मचरित्रात्मक उल्लेख जागोजागीं विखुरले आहेत. आपली 'पहिली कविता' नवसारी प्रांतातील गणदेवी या मुक्कामीं १८९६ सालीं एका गुजराती शेजाऱ्याला उद्देशून आणि वडील बधु विनायक गणेश गडकरी ह्याच्या मदतीनें आपण लिहिली असें त्यानीं म्हटलें आहे, *त्यावरून त्याचे बालपण गुजरातेंत गेलें असल्याचें सूचित होतें.* 'दसरा' ह्या कवितेंतील शेवटच्या कडव्यामध्यें 'केशवपुत्राचा महवूर, गोविंदाग्रज चेला सच्चा' ह्या ओळीमध्यें आपले काव्यगुरु केशवसुत असल्याचें त्यानीं जाहीर केलं आहे. या काव्यसग्रहामध्यें 'मित्रप्रीति' या नाटकातील तीन पदें दिलेलीं आहेत. आणि त्याच्या तळाशीं १९०२ हा सन आहे. त्यावरून गडकऱ्यानीं आपलें नाटक वयाच्या सतराव्या वर्षीं लिहिलं होतें असें दिसतें. 'हाल्या पिंपळपानास' ह्या कवितेच्या प्रारंभीं आपल्या राहत्या घराच्या खिडकीसमोर पिंपळाचें झाड असल्याचं त्यांनीं सांगितलं आहे तें वस्तुस्थितीस धरून आहे. '१३६ कसबा' या घरापुढे एक पिंपळाचा पार होता. आणि त्या पिंपळाची एक फांदी तिसऱ्या मजल्याच्या ज्या खिडकीमध्यें गडकरी सर्वोदित असत असत त्याच्यासमोर आलेली

होती. गडकरी घरातून बाहेर पडले म्हणजे प्रथम ह्या पिंपळाच्या पारावरील मुंजाबाला नमस्कार करीत असत. 'अभिनंदनपर वर्धापन,' 'निजलेल्या बालकांस' आणि 'नटमित्रास पत्र' या कविता अनुक्रमे चिंतामण द्वारकानाथ देशमुख (पुढें झालेले आय. सी. एस आणि 'सर'), बाळकृष्ण टोमरे आणि नटवर्य गणपतराव जोशी ह्यांना उद्देशून लिहिल्या असल्यामुळें ह्या थोर व्यक्तींबद्दल गडकऱ्यांना वाटत असलेला आदर त्यांतून प्रगट झाला आहे.

काव्यलेखनासाठीं 'गोविंदाग्रज' आणि विनोदलेखनासाठीं 'बाळकराम' हीं जीं टोपणनावें गडकऱ्यांनीं धारण केलीं, तीं देखील चरित्रसूचकच आहेत. अल्पवयांत मरण पावलेल्या आपल्या 'गोविंद' नावाच्या धाकट्या भावाला अमर करण्यासाठीं त्यांनीं 'गोविंदाग्रज' हें नाव धारण केलें. बाळकरामांतले 'राम' स्वतः तेच. एवढेंच नव्हे तर 'एकच प्याला' नाटकातल्या 'रामलाल' आणि 'तळीराम' ह्या दोन पात्रांच्या नावांमध्यें सुद्धां त्यांनीं आपल्याच नावामधला 'राम' घातला आहे. त्यांची आई त्यांना घरांत 'लालजी' असें म्हणत असे. त्या 'लालजी'तला 'लाल' त्यांनीं आपल्या 'राम' ह्या नांवाला जोडून रामलाल हें नाव बनविलें. त्याचप्रमाणें 'तळीराम'च्या तळातला 'राम' तो आपणच असेंहि ते क्वचित् गमतीनं म्हणत असत. हीं दोन पात्रें म्हणजे आपल्या व्यक्तिमत्त्वाचे उदात्त आणि मलिन असे परस्परविरोधी दोन पैलू होत असेंच जणु कांहीं त्यांना सुचवायचें होतें.

१९१७ च्या नोव्हेंबर महिन्यांत जरी 'एकच प्याला' नाटक गडकऱ्यांनीं लिहून पुरें केलें असलें तरी तें 'गंधर्व नाटक मंडळी'च्या रंगभूमीवर गडकऱ्यांच्या मृत्यूनंतर दहा अकरा महिन्यांनी आलें. सदर नाटकाचीं बरींचशीं पदें श्री. विठ्ठल सीताराम गुर्जर ह्यांनीं लिहिलीं. आणि त्या नाटकाची 'प्रस्तावना' सुद्धां लिहिण्याचें काम त्यांच्याकडेच आलें. त्या प्रस्तावनेंत 'एकच प्याला या नाटकाची उभारणी गडकऱ्यांनीं आपल्या स्वत:च्या अनुभवावर केली' ह्या गुर्जरांच्या विधानामुळें गडकरी हे एक अट्टल दारूबाज होते अशी त्यांची सार्‍या महाराष्ट्रांत जाहिरात झाली. किंबहुना, 'एकच प्याला' हें नाटक म्हणजे गडकऱ्यांचं स्वतःचेंच चरित्र होय येथपर्यंत म्हणण्याची कांहीं कांहीं लोकांची मजल गेली. प्रा. लक्ष्मणशास्त्री लेले हे गडकऱ्यांचे मोठे निंदक. ते म्हणत 'गडकरी काय, प्यायचे अन् लिहायचे!' मद्यपानाच्या व्यसनांत खोलवर बुडालेले गडकरी हे एक मद्यपी होते, असा त्यांच्याबद्दल जो सार्वजनिक समज आजपर्यंत पसरलेला आहे, त्याला 'एकच

प्याला' नाटकाच्या प्रस्तावनेंतलें गुर्जराचें वर सांगितलेलें वाक्य कारणीभूत आहे. गडकऱ्यांच्या बद्दलची ही समजूत कितपत सत्याला धरून होती ह्याचें विवेचन स्वत: त्या दैनंदिनींत त्यांनीं तत्संबंधीं जी एक नोंद केलेली आहे, तिच्या अनुषंगानें पुढें केलें आहे.

गडकऱ्यांनीं आपल्या काव्यलेखनाचा प्रारंभ जरी वयाच्या अकराव्या वर्षी पासून केला असला तरी त्यांचें साधारण परिपक्व स्वरूपाचें लेखन १९१० सालापासून, म्हणजे 'प्रेमसंन्यास' नाटक लिहिण्याच्या आधीं दोन वर्षांपासून प्रकाशित होऊं लागलें होतें. 'प्रेमसंन्यास' नाटक हें त्यांच्या परिणत प्रतिभेचें पहिलें दर्शन होय. त्यावेळीं ते सत्तावीस वर्षांचे होते. त्यानंतर ते पुढें अवघीं सातच वर्षे जगले. मरण्यापूर्वी अवघा अर्धा तास आधीं त्यांनी 'भावबंधन' चा शेवटचा प्रवेश लिहून पूर्ण केला. त्याच क्षणीं त्यांच्या नाट्यलेखनाचें आणि जीवनाचें 'भरतवाक्य' समाप्त झालें. सारांश, वयाच्या पंचवीसाव्या वर्षापासून तो चौतीसाव्या वर्षापर्यंतचा साधारण दहा वर्षांचा काळ हा त्यांच्या वाङ्मयनिर्मितीचा वसंत ऋतु होता असें म्हणावयास हरकत नाहीं. ह्या काळात सातआठ महिने कुठें पुण्याच्या शाळेंत त्यांनीं मास्तरकी केली असेल, नाहीं तर एखादें वर्ष त्यांनीं कॉलेजांत विद्यार्थी म्हणून हजेरी दिली असेल एवढेंच काय तें. पण तें करीत असतांना त्यांच्या वाङ्मयनिर्मितींत क्षणाचा सुद्धा खळ पडला नसेल. ह्या दहा वर्षांच्या कालखंडात वाङ्मयाचा अहोरात्र अभ्यास आणि निदिध्यास, वाचन आणि लेखन ह्यावांचून त्यांनीं कांहींहि दुसरें केलें नाहीं. त्याखेरीज का महाराष्ट्रभाषेंत अमृताशीं पैजा जिंकणारें अक्षर वाङ्मय त्यांना निर्माण करतां आलें?

ज्यांनीं आपलें सर्वस्व केवळ वाङ्मयाच्या उपासनेला वाहिलेलें आहे असे लेखक आज जसे थोडे आहेत, तसे त्या वेळींहि फार थोडे होते. ढोकळ मानानें बोलावयाचें झाल्यास वाङ्मय हा महाराष्ट्रांतल्या लेखकाचा जोडधंदा आहे असें म्हणावें लागेल. ह्याचें कारण उघड आहे. केवळ लेखनावर उदरनिर्वाह करतां येण्यासारखी परिस्थिति अजूनहि महाराष्ट्रांत निर्माण झालेली नाहीं. मग त्या वेळची गोष्ट तर सांगावयासच नको. तथापि, उपजीविकेचें साधन म्हणून गडकऱ्यांनीं वाङ्मयाकडे कधीं पाहिलेंच नाहीं. दारिद्र्याची आणि हलाखीची परवा न करतांना आपल्या आयुष्यांतील क्षणन् क्षण त्यांनीं वाङ्मयाची तपश्चर्या करण्यांत चंदनासारखा झिजवला.

'प्रेमसंन्यास' नाटक लिहीपर्यंत तर गडकऱ्यांचें मासिक उत्पन्न वीस पंचवीस रुपयांच्या घरांत होतें. तेरा सालापासून तो अठरा सालच्या अखेरीपर्यंत नाटकें, कविता आणि पुस्तकें ह्यांजवर त्यांना सालिना हजार बाराशें रुपये

मिळू लागले. म्हणजे त्यांचें मासिक उत्पन्न पाऊणशे ते शंभरापर्यंत जाऊन पोहोंचलें. अर्थात्, ह्या प्राप्तीच्या रकमा कांहीं नियमितपणें त्यांच्या हातीं पडत नसत. त्यामुळें त्यांची स्थिति नेहेमींच ओढगस्तीची असे. त्यांच्या कुटुंबात स्वत ते, त्यांच्या मातोश्री, दुसरी बायको आणि धाकटे बंधु आणि एक आश्रित मुलगा अशीं पाच माणसें होतीं. शिवाय येणाऱ्या जाणाऱ्या माणसांची वर्दळ फार असे. त्यामुळें चहाची पाणपोई सदैव वाहत असे. त्याखेरीज त्यांची विडीकाडी, प्रवास, कपडे, औषधें आणि पुस्तकांची खरेदी ह्यामुळें महिना अगदीं शंभर रुपये मिळाले तरी खर्चाची तोंड मिळवणी मोठ्या मिनतवारीनें होत असे. हा सगळा तपशील मुद्दाम सांगण्याचें कारण हें की गडकरी हे पराकाष्ठेचे व्यसनी होते अशी ज्यांनीं आपली समजूत करून घेतली असेल त्यांना त्यांच्या आर्थिक परिस्थितीची कल्पना यावी. आणि दुसरी गोष्ट अशी की अवघ्या दहा वर्षांच्या आत त्यांनीं एवढें देदीप्यमान वाङ्मय निर्माण करून आपला अवतार संपविला, त्यांना आलतू फालतू गोष्टींत वेळ दवडावयाला सवड होतीच कुठं मुळीं ?

गडकऱ्यांची ही दैनंदिन वाङ्मयोपासना कशी चाले ह्याची आता थोडीशी कल्पना देतो. गडकरी ज्या घरात भाड्यानं राहत असत तें '१३६ कसबा' घर हें तीन मजली असून गडकरी दुसऱ्या आणि तिसऱ्या मजल्यावर राहत.' दुसऱ्या मजल्यावर त्यांच्या कुटुंबातली मंडळी राहत तेथें गडकरी जेवणापुरते काय दोन वेळा खालीं उतरत असतील तेवढेंच. नाहीं तर त्यांचा अष्टौप्रहर मुक्काम तिसऱ्या मजल्यावर रस्त्याकडच्या खिडकीशेजारी असावयाचा. हा तिसरा मजला म्हणजे एक प्रशस्त 'हॉल'च होता. मध्ये एक अर्धवट पडद्याचा आडोसा घेतलेला होता. पलीकडच्या बाजूला पुस्तकांचें एक काचेचें कपाट होतें. त्यात हजार पांचशें तरी पुस्तकं खच्चून भरलेलीं होतीं. त्यामध्यें इंग्रजी पुस्तकांचा भरणा विशेष असे. पुण्याला त्यावेळीं एक 'युरोपियन जिमखाना' असे. तेथ दर महिन्याला जुन्या पुस्तकांचा लिलाव करण्यांत येत असे. त्यावेळीं गडकरी तेथ हमखास हजर असत. त्याखेरीज शनिवारवाड्यासमोर त्यावेळीं दर रविवारीं आणि बुधवारीं भरणाऱ्या जुन्या

बाजारातून दुर्मिळ पुस्तक खरेदी करण्याचा नाद गडकऱ्यांना होता ह्या पुस्तकांच्या कपाटाशेजारीं एक भली मोठी काळी पेटी होती त्यात गडकऱ्यांच्या एकूण एक लिखाणाच्या हस्तलिखिताचा गठ्ठा साठविलेला होता त्या पेटीवरच्या भिंतीवर 'मासिक मनोरंजन'च्या लेखकाची टांगलेली एक मोठी तसबीर, एका बाजूवर रघुनाथ वामन दिघे (आताचे सुप्रसिद्ध कादंबरीकार) ह्याचा 'गा रे गा रे गाच जरा ! माझ्या चिमण्या मुशाफरा' अशा खालीं ओळी लिहिलेला लहानपणचा गोजिरवाणा फोटो, दप्तरच्या ठिकाणीं खालीं जमिनीवर टेकून ठेवलेल्या श्रीदत्तराच्या आणि श्रीविठ्ठलाच्या दोन चिमुकल्या तसबिरी एवढें वजा केलं म्हणजे गडकऱ्यांचा तो तिसरा मजला अगदीं उजाड आणि ओसाबोसा भासे म्हणूनच 'प्रमसंन्यास' नाटकातल्या कमलाकराच्या 'भूतमहाल'चं नाव गडकऱ्यांच्या मित्रांनीं ह्या तिसऱ्या मजल्याला थट्टेनें दिलं होतें

ह्या घराच्या तळमजल्याला एक मारवाड्याचें दुकान होतं मधोमध वर जाण्याचा एक अरुंद जिना होता तिसऱ्या मजल्याच्या खिडकींत गडकरी बसले असले म्हणजे खालीं रस्त्यावरून आपणाकडे कोण येतो आहे याकडे त्यांचा कडक पहारा असे बहुतेक लोकांना ते खालच्या खालूनच पिटाळून लावीत आणि खिडकीपासून ते दूर असले आणि पहिल्या मजल्याच्या जिन्यावर कोणाचें नुसतें पाऊल वाजलें तर ते 'कोण आहे ?' म्हणून वाघा सारखें ओरडत हवे असतील त्यानाच ते वर येऊन देत एवढेंहि करून कोणी पहिला जिना ओलांडलाच तर त्याच्यासमोर 'गडकरी कामांत आहेत सध्याकाळीं या !' ही पाटी 'आ' वासून उभी असेच तिलाहि न जुमा नता एखादा धाडसी पुरुष वर जाऊ लागलाच तर दुसऱ्या मजल्यावर राहणारे गडकऱ्यांचे कौटुंबीय त्याची तेथून बोळवण करात इतक्या चौक्या ओलांडूनहि एखादा दुसरा माणूस तिसऱ्या मजल्यावर बेधडक येऊन पोहोचे नाहीं असें नाहीं अशाच एका प्रसंगीं मी होतों त्या अनोळखी माणसाच्या अंगावर गडकरी एकदम ओरडले, "मी फार कामात आहे तुम्हाला भेटायला मला वेळ नाहीं !" तो माणूसहि चागलाच घमक्या होता तो म्हणाला, "मला तर काहीं तुम्ही कामात आहात असं दिसत नाहीं विड्या ओढीत तर बसलां आहांत !" तेव्हां गडकरी म्हणाले, "लोकांना ज्यावेळीं मी कामात नाहीं असें वाटत, त्याच वेळीं मी खरा कामात असतों" गडकऱ्यांची निदान एक कोटी तरी ऐकायला मिळाली एवढ्यावरच समाधान मानून तो इसम मुकाट्यानें मागल्या पावलीं परत गेला

अगदीं माणूसघाणें वागण्याइतकें गडकऱ्यांचें हें वागणें असे मोठमोठ्या

कवींची आणि लेखकांची भीडभाड न धरता ते त्याना घराच्या दारापासून ताडकन् पिटाळून लावीत. त्यामुळें अनेकांचा त्यांच्याविषयीं अतिशय गैरसमज होई. पण गडकऱ्यांनीं त्याची कधीं परवा केली नाहीं. ही अशी त्यांची वृत्ति होण्याचें कारण हें की गडकरी अष्टौप्रहर वाचनात, चिंतनात किंवा लेखनात निमग्न असत. आणि म्हणून आपल्या समाधींत कोणीं व्यत्यय आणला किंवा तिचा कोणीं निष्कारण भंग केला तर ते अतिशय संतापत. वाङ्मय हेंच मुळीं गडकऱ्यांचें जीवन होतें. त्यांच्या निःश्वासातून, त्यांच्या वाणींतून आणि त्यांच्या लेखणींतून वाङ्मयाखेरीज काहींच प्रकट झालें नाहीं. चोवीस तास वाङ्मयाच्या धुंदींत आणि प्रतिभेच्या मस्तींत असलेला असा सरस्वतीपुत्र महाराष्ट्रात क्वचितच कोणाला पाहावयाला मिळाला असेल.

त्यांच्या तोंडून निघणारें प्रत्येक वाक्य हें त्यांच्या नाटकातल्या पानां प्रमाणें टाळ्या घेणारें किंवा हशा निर्माण करणारें असे. कोटिबाजपणा हा त्यांच्या रोमरोमात भिनलेला होता. त्यामुळें ते कोणता शब्द कोणावर कसा उलटवतील ह्याचा कधीं पत्ता लागत नसे. तसें पाहिलें तर त्यांचें शिक्षण काय होतें? पण, त्या मानानें त्यांचें वाचन पाहिलें तर तें एखाद्या पंडिताला देखील लाजवणारें होतें. संस्कृत काव्यें आणि नाटकें त्यांना मुखोद्गत असत. प्राचीन मराठी वाङ्मयाचीं त्यांनीं पारायणें केलीं होतीं. तुकोबाची आणि नामदेवाची गाथा तर नेहमी त्यांच्या उशागतीच असे. ऐतिहासिक बखरींचा आणि शाहिरी वाङ्मयाचा त्यांनीं फार मार्मिकपणें अभ्यास केलेला होता. विष्णुशास्त्री चिपळुणकरांच्या 'निबंधमाले'चीं त्यांनीं अनेकदा आवर्तनें केलीं होतीं. पण सर्वांत विशेष म्हणजे त्यांचें इंग्रजी वाङ्मयाचें वाचन मोठमोठ्या प्राध्यापकांनीं हेवा करावा असें होतें.

शेक्सपीअरचीं सगळींच नाटकं त्यांनीं वाचलीं होतीं असे मी म्हणत नाहीं. पण हॅम्लेट, ऑथेल्लो, मर्चंट ऑफ व्हेनीस, टेमिंग ऑफ दि श्रू हीं नाटकं त्यांनीं अत्यंत चोखंदळपणें वाचलीं होतीं. त्याखेरीज शेरिडन आणि बेन जॉन्सन ह्यांच्या लोकप्रिय नाट्यकृतींशीं त्यांचा परिचय होता. सुप्रसिद्ध फ्रेंच नाटककार मोलियर त्यांनीं संपूर्ण वाचून काढला होता. मेटरलिंकची 'मोना व्हॅना' त्यांच्या डोक्यात गोल फिरून बसली होती. इब्सेनशीं तर त्यांची चांगलीच जानपछान होती. सुप्रसिद्ध नाट्य टीकाकार मोल्टन ह्यानीं शेक्सपीअरच्या नाटकावर लिहिलेला सुविख्यात ग्रंथ त्यांनीं पूर्णपणें अभ्यासिलेला होता. त्याखेरीज मार्क ट्वेन, चार्ल्स डिकन्स, जीरोम के. जीरोम ह्या पाश्चात्य साहित्यामधील नामांकित विनोदी लेखकांचें वाङ्मय तर त्यांच्या घरचेंच होतें. बायरन, शेले आणि कीट्स ह्यांच्या काव्याचें त्यांनीं

अत्यंत बारकाईनें परिशीलन केलें होतें. गडकऱ्यांच्या वाचनाची गमत अशी की ते जें जें म्हणून काहीं वाचीत त्यातील सर्वोत्कृष्ट भाग—त्यातील उत्तमोत्तम कल्पना, घटना, सुभाषितें आणि विनोद तें तें टिपून ठेवीत आणि त्यावर आपल्या कल्पनेचे स्वतंत्र इमले उभारीत असत.

रोज असें त्यांचें काहीं ना काहीं तरी वाचन चाललेलें असे. आणि त्या दिवशीं त्यांच्या बैठकीत जे जे कोणी बसलेले असत, त्यांच्यापुढें वाचलेल्या पुस्तकांतील विविध विचारांचें आणि कल्पनांचे भांडार ते इतक्या आकर्षक भाषेमध्यें मांडत की, ऐकणाराचे डोळे अक्षरशः दिपून जात. खाजगी बैठकींतलें त्यांचें संभाषण म्हणजे वाङ्मयांतील पंचपक्वान्नाची एक चमचमीत मेजवानीच असे. इतका आकर्षक संभाषक मीं तरी माझ्या आयुष्यांत दुसरा पाहिला नाहीं. हीं त्यांचीं वाङ्मयीन संभाषणें एक-तऱ्हेने त्यांचा लेखनपूर्व मानसिक व्यायामच होता असें म्हणावयाला हरकत नाहीं. कारण, बोलता बोलता अकस्मात् काहीं तरी नवीन कल्पना त्यांच्या डोक्यांत चमकून जाई. त्याबरोबर ते एकदम गप्प बसत आणि दोन्ही हात उलटे करून आपल्या मेंदूच्या खालच्या कप्प्याचा भाग ते जोराजोरानें चिमटू लागत. तेव्हा मग आपण समजावें कीं, गडकऱ्यांना आता स्फूर्तीचा झटका आला म्हणून. असे झटके त्यांना दिवसातून अनेकदा येत. बोलतांना, वाचतांना किंवा पत्ते खेळतांना. अन् मग त्यावेळीं हाताशीं जो कागद सापडेल त्यावर ती कल्पना ते झटपट टिपून ठेवीत किंवा एखादे वेळीं सबधच्या सबंध प्रवेश किंवा कविता झपाट्यानें लिहून टाकीत. डोक्यांत कोणतीहि कल्पना आल्यानंतर तिची गडकऱ्यांनीं नोंद करून ठेवली नाहीं असें कधींच व्हावयाचें नाहीं. त्या बाबतींत त्यांना आळस म्हणून कधीं नसे.

या स्फूर्तीच्या झटक्यांत त्यांना नव्या नाटकांचीं नांवें, त्यांचीं कथानकें, त्यामधल्या पात्रांच्या संभाषणांतलीं महत्त्वाचीं वाक्यें किंवा कोट्या भराभर सुचत असत. आणि मग शेजारीं जो कोणी माणूस बसला असेल त्याला ते सारें भडाभडा मन मोकळें करून सांगत. गडकऱ्यांनीं जें प्रत्यक्ष लिहून पूर्ण केलें त्याच्यापेक्षा किती तरी पटीनें जास्त त्यांना लिहावयाचें होतं. 'गर्वनिर्वाण' नाटकाचे तीन अंक त्यांनीं लिहिले होते. पुढें त्याचें हस्त-लिखित नापत्ता झालें. तथापि, त्या नाटकांतल्या हिरण्यकश्यपूला आणि कयाधूला त्यांनीं 'पुण्यप्रभावा'त वृंदावन-कालिंदी बनविलें आणि चरक यामर्कांना 'एकच प्याला'त वैद्य-डॉक्टर करून टाकलें. 'वेड्यांचा बाजार' आणि 'राजसंन्यास' हीं त्यांचीं दोन नाटकें आणि 'कृष्णाकांठीं कुंडल'

हें त्यांचें महाकाव्य अपूर्णच राहिलें. किलास्कराचें 'रामराज्यवियोग' हें नाटक त्यांनीं पूर्ण केलें होतें असें म्हणतात. यांगेरीज त्यांचे किती तरी संकल्प अपूर्ण राहिले!

रघुवंशाप्रमाणे त्यांना एकोणीस सर्गांचें 'शिवरथ' हें शिवछत्रपतींच्या चरित्रावर एक महाकाव्य लिहावयाचें होतें. त्याखेरीज 'शेरम', 'लालाराम,' 'सोन्याची सल्करी' अशा आम चरित्रात्मक कादम्बऱ्या, त्यानंतर 'तोड-टी-माळ,' 'शून्यसंन्यास,' 'गिरिजान्तर,' 'पिंडप्रदान' किंवा 'ब्रह्मनीसुम,' 'शिवराई शिक्षा,' 'मुरली शिक्षा' अशीं नाट्य लिहिण्याचा त्यांनीं संकल्प सोडला होता. ह्यांपैकीं काहीं नाटकांचीं संपूर्ण कथानकें आणि थोडेसे संवाद तर त्यांनीं लिहूनसुद्धां ठेवले होते. ते विनोदानें म्हणत, "शेक्सपीअर हा पूर्ण माणूस होता. त्यानें छत्तीस नाटकें लिहिलीं. मी अर्धवट माणूस आहे. म्हणून मी अठरा नाटकें लिहिणार आहें!" ह्यावरून गडकऱ्याच्या वैचारिक सृष्टीचा विस्तार केवढा अमर्याद होता ह्याची वाचकांना कल्पना येईल.

पण नुसत्या 'अमर्याद' ह्या विशेषणानें गडकऱ्यांच्या प्रकट वा अप्रकट वा अप्रकट वाङ्मयीन संसाराच्या वैशिष्ट्याची वाचकांना कल्पना येणार नाहीं. त्यांनीं जें कांहीं लिहिलें आणि कल्पिलें तें सर्वच्या सर्व अत्यन्त वेगळें आणि विलक्षण होतें. नावीन्य हा गडकऱ्यांच्या वाङ्मयाचा प्राण आहे. त्यांच्या भाषेवर, कल्पनेवर, विचारावर, विनोदावर नावीन्याचा ठसठशीत 'गडकरी' छाप अगदीं स्पष्टपणें उमटलेला आहे. म्हणून आधुनिक मराठी साहित्यांत गडकऱ्यांचें वाङ्मयीन व्यक्तिमत्व इतरांपेक्षा संपूर्णतया अपूर्व आणि अभिनव वाटतें. दुसऱ्यापासून गडकऱ्यांनीं प्रेरणा पुष्कळ घेतल्या असतील पण दुसऱ्यांनीं उष्टे केलेले विचार आणि कल्पना त्यांच्या वाङ्मयांत औषधा-पुरत्याहि सापडावयाच्या नाहींत. गडकऱ्यांच्या महान् लोकप्रियतेचें हें खरें बीज आहे.

एवढें सांगितल्यानंतर गडकरी हे सतत दहा वर्षे 'झपूर्झा'च्या अवस्थेत कसे वावरत होते आणि स्वतःच्या शारीरिक अस्तित्वाला ते कसे संपूर्णपणें विसरून गेले होते, ह्याची कल्पना येईल.

'झपूर्झा' ह्या कवितेंत कवीच्या अंतर्मनाचें जें चित्र केशवसुतांनीं रेखाटलें आहे, त्याचेंच स्पष्टीकरण त्यांनीं 'क्षणांत नाहींसे होणारे दिव्य भास' ह्या कवितेंत केलें आहे या कवितेच्या प्राक्कथनात ते म्हणतात, 'कवि, चित्रकार आणि तानसेन यांस जीं अलौकिक स्वप्नं, ज्या दिव्याकृति आणि जे गंधर्वा-लाप भासमान होतात—अहह! त्यांपैकीं किती थोडे मात्र त्यांस आपल्या

करामतींत गोवून ठेविता येतात बरें !' त्या कवितेंत शेवटीं ते म्हणतात कीं, कवीच्या आत्म्याला एवढा प्रत्यय स्पष्टपणें होतो कीं, आपण कांहीं तरी सुंदर पाहिलें आहे खरें. पण—

> 'हा, हा, हे जर सर्व भास धरता येतील मातें तर
> पृथ्वीचा सुरलोक कीं बनवुनी टाकीन मी सत्वर !'

'झपूर्झा' अवस्थेंत भासमान होणाऱ्या अद्भुत आकृति आणि त्यांच्या त्या निगूढ गीती किंवा कवीच्या मनामधून क्षणात नाहींसे होणारे दिव्य भास ह्यांना दर्शनाच्या, श्रवणाच्या वा जाणिवेच्या क्षेत्रात मुळीं आणताच येत नाहीं अशी जी केशवसुतांनीं आपली कल्पना करून घेतली आहे ती काव्य सृष्टींत मोठी गूढरम्य वाटत असेल, पण कलावंत हे कांहीं केशवसुत मानतात त्याप्रमाणें स्फूर्तीच्या हातामधलीं असहाय खेळणीं नव्हत. तसें असतें तर जगामधल्या दिव्य आणि अमर कलाकृति कधीं निर्माणच झाल्या नसत्या. झपूर्झावस्थेंत अंतर्मनाला दिसणाऱ्या अद्भुत आकृति आणि त्या गात असलेल्या निगूढ गीती ह्यांना मूर्त स्वरूप देण्याचें प्रत्येक कलावंताचें कांहीं तरी निश्चित तंत्र असलेंच पाहिजे, ह्यात कांहीं संशय नाहीं ! इतर लेखकाचें तंत्र काय असेल तें असो. पण गडकऱ्याचें तंत्र जें कांहीं होतें तें मीं अनेकदा प्रत्यक्ष पाहिलें आहे.

चालतांना, जेवतांना, बोलतांना, वाचतांना, विश्रांति घेतांना, विचार करतांना कोणतीहि कल्पना वा विचार डोक्यात चमकून गेला की तो गडकऱ्यांनी तात्काळ कागदाच्या कपट्यावर, वहीवर, डायरीवर किंवा पुस्तकाच्या पाठकोऱ्या भागावर टिपून 'बंदिस्त' केला नाहीं असें कधीं व्हावयाचें नाहीं. ह्या कामात त्यांनीं कधीं कंटाळा किंवा चालढकलपणा केला नाहीं. अशा उत्स्फूर्त आणि स्फुट कल्पनांच्या टिपणकागदांच्या राशीच्या राशी त्यांनीं आपल्या दप्तरात जपून ठेवलेल्या असावयाच्या. गडकऱ्यांच्या वाङ्मयनिर्मितीचा हाच कच्चा माल होय. त्यांपैकीं एकेक विचार आणि एकेक कल्पना निवडून काढून त्याचा ते इतका भव्य आणि मनोज्ञ विस्तार करीत कीं तो पाहून आपण थक्क होऊन जातों आणि अचंबा करीत राहतों कीं एकाहीपेक्षा एक चमत्कृतिपूर्ण कल्पनाचें विश्व गडकरी निर्माण तरी कसें करू शकले ?

यांत्रिक जगात ज्याप्रमाणें एखाद्या यंत्राचे सर्व बारीकसारीक घटक आधीं तयार केले जातात आणि मग ते एकत्र बरोबर जोडून पूर्णावस्थेंत तें यंत्र तयार करण्यात येतें, तशा तऱ्हेनें गडकरी आपली कलाकृति तयार करीत असत. एखादें नाटक लिहिण्याचा त्यांनी निर्धार केला म्हणजे तें नाटक संपूर्णपणें

त्याच्या डोक्यात शिजल्यानंतरच आणि त्याचे सर्व आराखडे आणि नकाशे (Blue Prints) कागदावर काढून तयार झाल्यानंतरच, ते प्रत्यक्ष लेखनाला आरंभ करीत नसत. त्या नाटकातले अनेक संवाद, त्यामधल्या कोट्या, सुभाषितें, वाक्यांचीं वाक्यें हीं सर्व त्यांनीं आधींच कागदावर नोंदून ठेवलेलीं असत. त्यामुळें प्रत्यक्ष नाट्यलेखनाला ते वाटेल त्या अंकापासून सुरुवात करीत असत. उदाहरणार्थ, 'राजसंन्यास' नाटकाच्या शेवटच्या अंकाचा पाचवा प्रवेश त्यांनीं २३ जून १९१६ ला पहिल्यानें लिहिला आणि त्याच अंकातले पहिले चार प्रवेश त्यांनीं ८ नि १० सप्टेंबर रोजीं लिहिले, तर पहिल्या अंकामधला पहिला प्रवेश त्यांनीं ५ नोव्हेंबरला लिहिला. असें हें गडकऱ्यांचें विक्षिप्त वागणें असे. शेवटचा अंक पहिल्यानें लिहावयाचा आणि पहिला अंक नंतर लिहावयाचा असला 'आधीं कळस मग पाया रे' छापाचा चमत्कार केवळ मराठी वाङ्मयातच नव्हे तर आमच्या माहिती प्रमाणें जगाच्या वाङ्मयात फक्त गडकरीच करूं शकले. इतरांची ती हिंमत झाली नाहीं, याचें कारण 'शापूर्ण' अवस्थेंत झालेले सर्व भास आणि साक्षात्कार हातात वेड्या घातलेल्या कैद्याप्रमाणें शब्दांच्या मूर्त रूपात आपल्या डोळ्यासमोर उभे केल्यावाचून त्यांनीं प्रत्यक्ष निर्मितीच्या कार्याला कधीं हातच घातला नाहीं. इतर लेखकांना लिहितां लिहितां कल्पना आणि विचार सुचतात, तर गडकऱ्यांना कल्पना आणि विचार अगोदर सुचल्यावाचून मुळीं लिहिताच येत नसे.

'राजसंन्यास' नाटकाच्या पुस्तकात प्रारंभीं सात पानांचीं टिपणें दिलेलीं आहेत. तीं ह्या पुस्तकाच्या परिशिष्टांत समाविष्ट करण्यात आलेलीं आहेत. तीं वाचल्यानंतर एखादा पूल किंवा इमारत बांधण्यापूर्वीं स्थापत्यशास्त्रज्ञ ज्याप्रमाणें शेकडो आराखडे करतो, त्याप्रमाणें नाट्यातील कथानकाची बांधणी करताना, त्यातील पात्रांच्या स्वभावाचे प्राकृतिक भेदाभेद आणि त्यामधील निरनिराळ्या घटनांचा कार्यकारणभाव निश्चित करताना गडकरी किती सूक्ष्म तऱ्हेनें निरनिराळ्या योजना आखीत असत ते समजून येईल. आपल्या 'शेल्म' या संकल्पित नाटकाचे त्यांनीं असेच जे आराखडे लिहिले होते ते ह्या पुस्तकात पाहावयाला मिळतील. यावरून लेखनशास्त्राचा गडकऱ्यांनीं किती पायाशुद्ध अभ्यास केला होता हें दिसून येतें. ज्या काळात गडकरी वावरत होते त्या काळात इतक्या तात्त्विक अन् शास्त्रीय दृष्टीनें आणि तन्त्रानें लेखन करणारे लेखक क्वचितच नव्हतेच असें म्हणावयाला हरकत नाहीं.

नाट्यलेखनाची ही शास्त्रीय दृष्टि त्यांना मोल्येर ह्या सुप्रसिद्ध नाट्यटीका-

साराच्या मथावरून आलेली असावी. मोल्टन त्यांनीं अतिशय काळजीपूर्वक वाचलेला होता. (पान ६१). आणि त्यामुळें नाट्यरचनेचे मूलभूत सिद्धांत त्यांना चांगलेच अवगत होते. मोल्टननें घालून दिलेल्या नाट्यपरीक्षणाच्या अनुमानपद्धती (Inductive Method) चाहि त्यांनीं अभ्यास केलेला होता, असें शेक्सपीअरचें 'मर्चंट ऑफ व्हेनिस', शेरिडनचें 'रायव्हल्स' आणि बेन जॉन्सनचें 'एव्हरी मॅन इन हिज ह्यूमर' ह्या तीन नाटकांचें त्यांनीं जें तपशीलवार विश्लेषण केलेलें आहे (पान ८१ ते ८६) त्यावरून कळून येतें.

पाश्चात्य नाटकांचें त्यांनीं जें परिशीलन केलें होतें, त्याचा परिणाम त्यांच्या नाट्यलेखनावर होणें अगदीं अपरिहार्य होतें. अर्थात्, त्यांनीं कोणत्याहि परकीय नाटकाचें भाषांतर या वाङ्मयचौर्य केलें नाहीं. त्यांच्याजवळ स्वतंत्र कल्पनांचें एवढें प्रचंड भांडार भरलें होतें कीं दुसऱ्यापासून उसनवारी करण्याची त्यांना जरुरीच काय होती? नवीन नवीन प्रेरणा मिळाव्यात आणि कल्पना सुचाव्यात हा त्यांच्या वाचनाचा मुख्य उद्देश असे. उदाहरणार्थ, मॉरिस मेटरलिंक ह्या सुप्रसिद्ध नाटककाराच्या 'मोना व्हॅना' ह्या नाटकाचा गडकऱ्यांच्या मनावर फार परिणाम झाला होता. देशाचें स्वातंत्र्य का पातिव्रत्य अशी एक विलक्षण समस्या त्या नाटकामध्यें उपस्थित करण्यात आली आहे. ह्या समस्येंत भारतीय परिस्थितीला अनुसरून गडकऱ्यांनीं 'पातिव्रत्य की प्राण' असा बदल करून त्यावर एक नाटक लिहिण्याचें योजिलें होतें. पण, तें काम त्यांच्या हातून पार पडलें नाहीं. तथापि, ती कल्पना त्यांच्या डोक्यातून अजिबात गेली नाहीं. 'पुण्यप्रभावा'त ती निराळ्या रूपानें प्रगट झालीच झाली. मोना व्हॅनाची समस्या वेगळें रूप घेऊन भूपालच्या तोंडून बाहेर आली, "पत्नीचें पातिव्रत्य आणि स्वतःचे प्राण ह्या दोहोंपैकीं कोणाचा त्याग करूं?" परमायतील उत्तमोत्तम नाट्य कृति वाचून गडकरी त्यांतून कशी प्रेरणा घेत त्याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे. इब्सेनच्या 'वॉरियर्स ऑफ हेल्गोलँड' या नाटकातल्या नायिकेवरून त्यांना 'राजसंन्यास'मधल्या तुळशीची कल्पना सुचली.

शेक्सपीअरच्या 'टेमिंग ऑफ दि श्रू' ह्या नाटकाचें 'त्राटिका' हें जें मराठी भाषांतर प्रा. केळकर ह्यांनीं केलेलें आहे, त्याची दाट छाया गडकऱ्यांच्या 'भावबंधन' या नाटकावर पडलेली आहे. त्या दृष्टीनें त्राटिका आणि लतिका किंवा प्रतापराव आणि घनश्याम ह्यांच्या स्वभावाची तुलना करून पाहण्यासारखी आहे. त्याशिवाय त्राटिकेचे वडील जे धनाजीराव त्यांच्या घरात त्यांच्या मुलीची प्रेमयाचना करण्यास रभाजी हा 'विद्याधर

शास्त्री पुराणिका'चें सोंग घेऊन शिरतो, तर राणोजी हा 'बुमय्या रायडू' या मद्रासी गवयाचें सोंग घेऊन राहतो. ही विनोदी घटना गडकऱ्यांनी 'भाव बंधना'त अगदीं सही सही घेतलेली आहे. लतिकेचे वडील जे धनेश्वर त्याच्या घरात लतिकेचा प्रियकर प्रभाकर हा 'महामहोपाध्याय गिरसप्पा' या कानडी पंडिताचें सोंग घेऊन शिरतो, तर धनेश्वराचे कागदपत्र चोरण्यासाठीं महेश्वर हा 'कामण्णा' या कानडी गवयाचें सोंग घेऊन राहतो.

'एकच प्याला' हें नाटक गडकऱ्यांना शेक्सपीअरच्या ऑथेल्लोवरून सुचलें असें जर मी सांगितलें तर कोणी त्याजवर विश्वास ठेवील काय? पण ती खरी गोष्ट आहे. ऑथेल्लो म्हणजे सुधाकर, डेस्डिमोना म्हणजे सिंधू, आयागो म्हणजे तळीराम आणि एमिलीया म्हणजे गीता अशीं पात्रे डोळ्या समोर करून आणि संशयाचें रूपांतर मद्यपानात करून 'ऑथेल्लो'ची आणि 'एकच प्याल्या'ची जर तुलना केली तर त्या दोन्ही नाटकांमधलें साम्य लक्षात येईल. एवढेंच नव्हे, तर 'एकच प्याला' नाटकातील एकच प्याल्याचा जो मूलभूत सिद्धान्त आहे, तो आणि 'एकच प्याला' हें नाव देखील गडकऱ्यांना 'ऑथेल्लो'वरूनच सुचलेलें आहे हें अगदीं उघड आहे.

तुर्की आरमाराचा ऑथेल्लोनें पराभव केल्यानंतर त्या विजयाच्या आनंदानें त्याच्या छावणींतले सारे सैनिक आधींच बेहोष होतात आणि मग त्या बेहोषींत मद्याची भर पडल्यानंतर त्यांनीं त्या रात्रीं काय जल्लोष केला असेल ह्याची कल्पनाहि करता येणार नाहीं. ऑथेल्लोचा दुय्यम साहाय्यक कॅशियो म्हणून होता. त्याला दारू फार चढे. म्हणून त्यानें त्या रात्रीं फक्त 'एकच प्याला' (one cup only) घेतला होता. पण त्याला दारू पाजून बेहोष करण्याच्या उद्देशानें त्या नाटकातला खलपुरुष आयागो त्याला फक्त 'एकच प्याला' आणखी पिण्याचा आग्रह करतो. तो त्यांच्यामधला संवाद असा.

आयागो : चल, ऑथेल्लोच्या आरोग्यासाठीं आपण आज दारू पिऊ या!
कॅशियो : नको रे, आज रात्रीं नको. मला दारू मुळींच सहन होत नाहीं. आनंद व्यक्त करण्याचें दुसरें एखादें साधन नाहीं का?
आयागो : But one cup only (अरे, एकच प्याला रे!)
कॅशियो : अरे, एकच प्याला मीं आज रात्रीं घेतला आहे तो देखील इतका हात राखून, तरी देखील त्यानें माझी काय दशा करून टाकली ती पाहा!
आयागो : (स्वगत) याला जर मला आणखी एकच प्याला पाजता आला तर काय मौज होईल! मग काय हा माझ्या मालकिणीच्या कुत्र्या सारखा पिसाळेल अन् सर्वांना चावत सुटेल!

करीम    अप्रकाशित गडकरी

साराश, माणसाची पिण्याची जी ठराविक मर्यादा असते, तिच्यात आणखी 'एकच प्याल्या'ची भर पडली तर तो पशु होतो, ही जी शेक्स पीअरची कल्पना आहे ती गडकऱ्यांनीं सुधारकाच्या तोंडून चौथ्या अकात वदविली आहे "या सद्यपावस्थेच्या शेवटच्या दिवसात तर हे प्रमाण वाढत वाढत इतक्या नाजुक मर्यादेवर येऊन ठेपलेलें असते कीं नैमिक सपल्यानतर एकच प्याला अधिक घेतला तर तो अतिरेकाचा झाल्यावाचून राहू नये समोहावस्था जाऊन उन्मादावस्था पहिल्यान सुरू करणारा असा हा एकच प्याला बरळण, तोल सोडण, ताल सोडण, कुठें तरी पडण, काहीं तरी करण या गोष्टी अतिरेकामुळें त्याच्याकडून घडूं लागतात "

'एकच प्याला'च मूळ कथानक जरी गडकऱ्याना हरि नारायण आपटे ह्याच्या 'भलत्या चुकीचा घोर परिणाम' ह्या दीर्घकथेवरून सुचलेलें असलें आणि त्यातील मूळ सिद्धान्त आणि पात्रचौकट जरी त्यानीं शेक्सपीअरवरून घेतलेली असली, एवढच नव्हे तर वैद्य आणि डाक्टरनें रोग्याला एकाच वेळीं तपासण्याची विनोदी घटना त्यानीं मोलियरच्या 'लामूर मेदेसिन (प्रेम हाच खरा वैद्य)' या नाटकातून (अक २, प्रवेश ४) घेतलेली असली, तरी 'एकच प्याला' नाटक हें केवळ गडकऱ्याच्या अलौकिक आणि देदीप्यमान प्रतिभेचा स्वतन विलास होय ह्यात काय शका? जगातील उत्तमोत्तम वाङ्मयाच्या आस्वादाचा उन्माद गडकऱ्याना कित्येकदा जरी अनावर झाला असला तरी, त्याची प्रतिभा स्वत च्या पखाच्या सामर्थ्यावर कल्पनेच्या स्वर्गीय वातावरणात उड्डाण करीत असे हें विसरता कामा नये गडकऱ्याच्या जीवनाची आणि लेखनाची ही सर्व पार्श्वभूमि लक्षात घेऊन, आता या पुस्तकात प्रथमच प्रसिद्ध होत असलेल्या त्याच्या स्फुट आणि अपुऱ्या कल्पनाचा विचार करू या

ह्या पुस्तकातलें प्रारंभींचें अपूर्ण गद्य नि पद्य लेखाचे दोन भाग गड कऱ्याच्या प्राथमिक लेखनाची वाचकाना थोडीशी तरी कल्पना यावी या दृष्टीनें दिलेले आहेत त्यातील दोन प्रकरण तर पुनर्मुद्रित आहेत 'याला साहस कोण म्हणणार नाहीं!' या कथेचे नायक 'हरिहर' म्हणजे स्वत राम गणेश गडकरी होत हें ओळखणें काहीं कठीण नाहीं बालपणीं गड कऱ्यांनीं जें काहीं उडाणटप्पू वाचन—किंवा उपवाचन केलें त्याची जरी त्यानीं या लेखनात दिली आहे गडकऱ्याचा प्रेमकाव्य वाचून काहीं टीकाकारानीं गडकरी हे स्वत कोणा तरी 'सुन्दरी च्या प्रेमात पडले असले पाहिजेत असा निष्कर्ष काढलेला आहे त्याला या लेखात गडकऱ्यानीं जणु काहीं आगाऊच उत्तर देऊन ठेवलेलें आहे

हरिहरचें वर्णन करताना ते म्हणतात, '*प्रणयिनीवाचून तो प्रणयी झाला*

होता. विरहावाचून तो विरहव्यथा अनुभवीत होता. जग त्याला उदास भासत होतें. प्रेमशून्य जीविनाला तो कंटाळला होता.' यावरून 'प्रणयवेडा' होण्यासाठीं क्वचित् हमखास प्रणयिनीच लागते ही जी टीकाकाराची कल्पना आहे ती किती वेडगळ आहे हें दिसून येतें.

'शैलम' कादंबरींमधील पात्रें, प्रकरणें आणि कल्पना ह्यांचीं टिपणें वाचून वाटतें, ती कादंबरी जर गडकऱ्यांनीं पूर्ण केली असती तर ती एक काहीं तरी विलक्षणच मौज झाली असती. ही कादंबरी कोठल्या तरी वास्तववादी घटनेवर आधारलेली असावी असें वाटतें आणि तिच्यातील कित्येक पात्रें गडकऱ्यांच्या परिचयातील काहीं व्यक्तींवर आधारलेलीं असावीत असें दिसतें. उदाहरणार्थ, महर्षि धोंडो केशव कर्वे ह्यांचे द्वितीय चिरंजीव डॉ. शंकरराव कर्वे, जे आफ्रिकेंत गेलीं चाळीस वर्षे वास्तव्य करून आहेत, त्यांच्यावरून ह्या कादंबरींतल्या 'शातु' ह्या पात्राची कल्पना गडकऱ्यांना सुचली होती अशी त्यांनीं आपल्या स्मरणटिपणात नोंद करून ठेवलेली आढळते (पान ३५).

गडकऱ्यांनीं ज्यावेळीं 'प्रेमसंन्यास' हें नाटक लिहिलें, त्याच वेळीं 'तोड-ही-माळ' ह्या नाटकाचें कथानक त्यांच्या डोक्यात घोळत होतें. मिश्रविवाहाच्या समस्येवर हें दुःखपर्यवसायी नाटक आधारलेलें होतें. त्या नाटकाचा नायक श्यामल आणि नायिका तरु. त्याशिवाय त्यामध्यें कौस्तुभ कांता, मणि-मुकुल, सावित्री-वैकुंठ या प्रेमिकांच्या इतर जोड्या होत्याच. प्रत्येक अंकाच्या शेवटीं एकेका प्रेमिकांच्या जोडीचा विवाह मोडतो आणि त्यामुळें त्यांच्या विवाहाची माळ तुटते. म्हणून त्या नाटकाचें नाव 'तोड ही माळ' असें ठेवण्यात आलें होतें. श्यामल आणि कौस्तुभ हे दोघेहि फर्ग्युसन कॉलेजचे विद्यार्थी असतात. घरच्या गरिबीमुळें श्यामल कॉलेज सोडतो कौस्तुभ इंग्लंडला जाऊन आय्. सी. एस्. होतो आणि न्यायाधीश होतो. श्यामलचें प्रेम तरु नावाच्या एक सुंदर मुलीवर असतें पण दोघेहि भिन्न जातीचे असल्यामुळें त्यांचा विवाह होऊ शकत नाहीं. तरुचें लग्न तिच्या जातींतल्या एका व्यसनी मागसाशीं होत. हा माणूस एके दिवशीं तरूला मारझोड करीत असता तिच्या साहाय्यासाठीं श्यामल तिच्या घरात शिरतो. त्या गडबडींत तरूचा पति मारला जातो. आणि खुनाचा आरोप श्यामलवर येतो. आणि तो खटला त्यांच्या कॉलेजमधल्या पूर्वीचा सहाध्यायी जो कौस्तुभ ह्याच्या कोर्टांत येतो. कथानकाचा एवढाच भाग आठवणींत आहे. सदर कथानक सर हॉल केनच्या एका सुप्रसिद्ध कादंबरीवर जरी आधारलेलें होतें, तरी त्यात गडकऱ्यांच्या जीवनातील अनेक घटना आणि सारीपुरी पात्र येणार होतीं एवढेंच नव्हे तर स्वत गडकरी आपलें

स्वतःचें एक पान ह्या नाटकात घालणार होते त्या संबंधाचे पुढील उल्लेख पान ६१ वर आहेत

"ह्या ठिकाणी गडकरी ही व्यक्ति पात्ररूपानें S B M (म्हणजे किर्लोस्कर नाटक मंडळीचे सुप्रसिद्ध व्यवस्थापक शंकर बापूजी मुजुमदार) वगैरेसह कौस्तुभाच्या घरीं आणणें गडकरी & कौस्तुभ Versus कैलास गडकरी वगैरेंचा प्रवेश प्रेमसंन्यासाचें उत्तर कैलास angry गडकरी s taunts S B M मेहेंदळे (सदू), कोल्हटकर, रविवारचे नाटक वगैरे इथेंच पत्ते पत्तो अतोनात हें पात्र आणणें " ह्या टीपक टिपणावरून शंकर बापूजी किंवा स्वत गडकरी आणि मेहेंदळे, कोल्हटकर (चिंतामण) आणि अतोनात हे त्याचे मित्र कोणत्या संदर्भांत ह्या नाटकात येणार होते याचा बोध होत नाहीं पण त्या नाटकातील हा बहुधा विनोदाचा मालमसाला असावा कारण, 'प्रमदि वनि'मधल्या'ची अद्भुत कल्पना काढणार जें विनोदी पात्र कैलास, त्याचा ह्या सव मडळींशीं संबंध येतो

'तोडलेली माळ' च्या पहिल्या प्रवेशाचा जो अल्पतर टीपक भाग उपलब्ध आहे यात 'चार चद्राची' कल्पना पराकाष्ठेची काव्यात्मक आहे तथापि, त्या नाटकाची 'अर्पणपत्रिका' आणि 'मगलाचरण' हे मात्र गडकऱ्यांच्या प्रतिभेचे दोन अत्यंत तेजस्वी उन्मेष आहेत असं म्हटलें पाहिजे त्यातील शब्दाशब्दावर गडकऱ्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीचा ठिकाणा आहे

गडकऱ्यांच्या उर्वरित अपूर्ण आणि चोटक कविता ज्या या संग्रहात प्रकाशित केल्या आहेत, त्यात सर्वांना परिचित असलेल्या 'गोविंदाग्रजा'च्या काव्यात्म शैलीच आल्हाददायक दर्शन निश्चितपणें होत एवढच नव्हे, तर त्यातल्या कित्येक काव्यपक्तींमधून गडकऱ्यांच्या अंतःकरणात दडलेल्या कसल्या तरी व्यथेची जाणीव होऊन मन क्षणमात्र व्याकुळ झाल्यावाचून रहात नाहीं या ठिकाणी गडकऱ्यांनीं आपल्या आयुष्यात लिहिलेल्या एका शेवटल्या कवितेचा उल्लेख करणें मला अपरिहार्य वाटतें कारण, ती कविता आणि ज्या प्रसंगीं ती लिहिली गेली तो प्रसंग आता मला एकट्या लाच माहीत आहे

गडकऱ्यांनीं आपली पहिली पत्नी सीताबाई ही तरुणपणींच टाकून दिली होती कोणी म्हणत, ती त्याना सोडून गेली होती त्यानंतर मरणापूर्वी एक वर्ष आधीं त्यांनीं रमा नावाच्या एका तरुण मुलीशीं लग्न केलं होतें उभयताच्या वयात सोळा सत्रा वर्षांचें अतर होतें वस्तुत, या विवाहाच्या वेळेपासूनच गडकऱ्यांची प्रकृति ढासळू लागली होती म्हणून हा विवाह केवळ नाममात्रच होता आणि त्यापासून त्या दोघांपैकी कोणाला कसलेंच

पुरा लागल नाहीं. उभयताची एकान्तात जेव्हा पहिल्यांने भेट झाली त्याच वेळीं या विवाहाच्या वेड्याची गडकऱ्यांना पुरी कल्पना येऊन चुकली. त्या निराश आणि व्याकुळ मन स्थितींत गडकऱ्यांनीं जी कविता लिहिली होती, ती त्यांच्या मृत्यूनंतर जेव्हा मी 'वाग्वैजयंती' चे हस्तलिखित तयार करीत होतो, तेव्हा अचानक माझ्या हातांत आली. ती कविता आता मला काहीं स्मरत नाहीं. पण तिच्या शेवटीं अनुष्टुभाच्या ज्या दोन ओळी होत्या, तेवढ्या मात्र या क्षणापर्यंत मी माझ्या स्मरण सपुटांत जपून ठेवलेल्या आहेत. त्या अशा

'गोविंदाग्रज' याही ही पहिली भेट संभ्रम
पहिला आणि शेवटला सफल स्पर्श हा ××

दुसऱ्या ओळींतल्या शेवटच्या दोन पुल्या 'रमे' या पत्नीच्या नावाच्या संबोधनात्मक रूपाबद्दल आहेत. ह्या कवितेंत गडकऱ्यांच्या चरित्रामधल्या एका अत्यंत खाजगी आणि दु:खद घटनेचा उल्लेख असल्यानें त्याचे धाकटे बंधु मनुमाळ ह्यांनीं ती कविता त्याचवेळीं फाडून टाकली.

या संग्रहांतील 'स्मरणार्थ टिपण' हें प्रकरण सर्वांत जास्त महत्त्वाचें आहे. 'झपूर्झा'वस्थेंत गडकऱ्यांना मासमान झालेल्या अनेक कल्पना आणि सुचलेले विचार ते ताबडतोब कागदावर असे टिपून ठेवीत त्याचें वर्णन यापूर्वीच केलेलें आहे. गडकऱ्यांनीं आपल्या नाटकांत किंवा इतर लेखांत न वापरलेल्या कितीतरी तेजस्वी कल्पना, कोट्या आणि सुभाषितें ह्याची ह्या 'टिपणांत' अगदीं रेलचेल उडालेली आहे.

नुसत्या कोट्याच बघा. (१) तोंडास तोंड दिलें तर दामदुपटीनें परत मिळतें—एका तोंडाचीं दोन तोंडे होतात. (२) लग्नाच्या शृंखला तोडण्याचा प्रयत्न केला तर खटखडाट जास्त होतो. (३) बाळपणांत खेळाचें प्रेम असतें. तरुणपणांत प्रेमाचे खेळ असतात. (४) माझे प्राण घेशील तर मरेपर्यंत तुझे उपकार विसरणार नाहीं. (५) मारवाडी लोक कनट आणि काता दोन्हीहि झाकून ठेवतात. (६) पुस्तकाचीं 'पानें' चाळलीं पण 'फळ' नाहीं. (७) या मारामारींत त्याचा हात होता. अन् माझेंहि अंग होतें. (८) विडा खायचा नाहीं असा विडा उचलला. (९) भुताचे पाय उलटे तर मायमाचें डोके उलटें. (१०) पूर्वीं आईबाप मुलांचीं लग्न करीत. हल्लीं मुलांचे आईबापच लग्न करतात. (११) गाडी चालू होताच आम्ही स्थिर झाला. (१२) वरात आल्यापासून सुनेला नांवें ठेवू

विचारानें आपणास आपल्या मनाचें समाधान करतां येण्यासारखें आहे. परंतु माझ्या स्वतःच्याच मनाचें समाधान होत नसतां मी तो विचार आपणापुढें मांडणें म्हणजे निव्वळ थट्टा होणार आहे."

त्या पत्राच्या शेवटीं "महाराष्ट्रांतील अत्यंत प्रतिभावान् कवि, नाटककार व लेखक नाहीसा झाला. त्याचा देह जरी नष्ट झाला आहे, तरी ते कीर्तिरूपानें नेहमीं अवशिष्टच राहतील" हें गडकऱ्यांच्या लोकोत्तर कार्याचें कोल्हटकरांनीं जें मूल्यमापन केलें होतें, तें किती अचूक होतें याचा पडताळा बेचाळीस वर्षांनंतर आज आपण आपल्या मनाशीं करून पाहावा.

व्यक्तिरूपानें गडकरी आपल्यामधून निघून गेले आहेत. या पुस्तकांत त्यांच्या वाङ्मयीन तपस्येचे आणि व्यक्तिगत जीवनाचे जे कांहीं अवशेष इतक्या वर्षांनीं प्रसिद्ध करण्यात येत आहेत त्याची पार्श्वभूमि आजच्या मराठी वाचकांना नीट कळावी म्हणून प्रस्तावनेचा एवढा विस्तार करावा लागला. गडकरी हे एककल्ली होते, लहरी होते, विक्षिप्त होते, व्यसनी होते, गुरुजनांची किंवा वडिलधाऱ्यांची मर्यादा न राखणारे होते, आळशी होते असे अनेक अपसमज त्यांच्या रोजनिशीमधील आणि पत्रव्यवहारांतील कांहीं मजकुरावरून कित्येकांचा होण्याचा संभव आहे.

तथापि, ह्या प्रस्तावनेच्या अगदीं प्रारंभापासून गडकऱ्यांच्या जीवनाचें जें एक मध्यवर्ती सूत्र आम्हीं सांगितलें आहे, तें लक्षांत घेतल्यावांचून गडकऱ्यांच्या व्यक्तिगत जीवनामधील निरनिराळ्या विसंगतींचा उमज होणार नाहीं. गडकरी हे देहानें मुळीं जगतच नव्हते. आपल्या व्यक्तिमत्वाचें त्यांना भानच उरलें नव्हतें. अष्टौप्रहर, रात्रंदिन, चोवीस तास ते त्या 'ब्रह्मपूर्ण' स्थितींत तल्लीन झालेले असत. त्यामुळें व्यवहारी जगाची अवधानें त्यांना कधीं सांभाळतांच आलीं नाहींत. त्यांच्या 'मुरली' गीतांत त्यांनीं राधाकृष्णाच्या पूर्णैक्याचें जें वर्णन केलें होतें कीं

उरलें न शीत वा उष्ण
कांहीं न शुभ्र वा कृष्ण

तें त्यांना स्वतःलाच जास्त लागू पडतें

त्या नादरसाचे प्याले
मनि 'गोविंदाग्रज' प्याले
बाहेर मुरलीचे बनले
मग गानिं वाजविती मुरली!

निश्वासघले जे असख्य नाद त्याच्या जीवनात घुमत होते, त्याच्या सगीत रसाचे एकच नव्हे असंख्य प्याले झोकून त्याना वाङ्मयानन्दाची जी धुदी चढली होती तिच्या नादात आज्म आपल्या प्रतिभेची 'मुरली' वाजवीत ते बसले होते

त्याच्या चिंतनात, विचारात आणि लेखनात अपवित्र आणि अमगल असे काहींही नव्हते भारतीय सस्कृतीच्या विशुद्ध, अभिजात आणि उज्ज्वल परपरेवर त्याच्या आत्म्याचे पोषण झाले होते, ह्याचे अनेक पुरावे त्याच्या वाङ्मयात जागोजाग आढळतील

'पुण्यप्रभावा'त जेव्हा वृन्दावन दानाराच्या पोटात कट्यार खुपसू लागतो, त्यावेळी वसुधरा 'शिवलीलामृता'तील अकराव्या रुद्राध्यायाचा पाठ जेव्हा म्हणू लागते

> 'अश्वशाळा गजशाळा सपूर्ण
> सर्व सपत्तीसहित गृहदान
> महानदेनें स्नान करून
> भस्म अंगीं चर्चिलें

तेव्हा भारतीय सस्कृतीचे ववढें भव्य आणि उदात्त चित्र डोळ्यापुढे उभे राहतें!

म्हाताऱ्या घनेश्वराशीं लग्न करण्याची आपल्या मुलीला परवानगी देताना अश्रुपूर्ण नेत्रानीं आणि रक्तबंबाळ काळजानें जेव्हा धुडिराज तिला आशीर्वाद देतो, 'बेटा मालती, अष्टपुत्रा सौभाग्यवती भव जा म्हाताऱ्या घनेश्वराशीं लग्न कर, नाहीं तर एखाद्या प्रेताशीं लग्न लाव, तुझा ससार सुखानें साजरा होइल—

> शास्त्राभ्यास नको, श्रुती पढु नको,
> तीर्थास जाऊ नको,
> योगाभ्यास नको, व्रते मख नको,
> तीव्रें तपें तीं नको,
> काळाचें भय मानसीं धरु नको,
> दुष्टासि शकू नको,
> ज्याचीया स्मरणे पतीत तरती
> तो शभु सोडू नको!'

तेव्हां भारतीय जीवनामधलें सारें ओज आणि पावित्र्य आपल्या डोळ्यापुढें प्रकट होतें आणि डोळ्यांतून अश्रूंच्या गंगा-यमुना वाहूं लागतात.

'राजसंन्यास' मध्यें संभाजी जेव्हां म्हणतो कीं, 'ज्ञानोबाची मराठी वाणी—शिवबाची मराठी करणी—दिगंत उल्लंघून दाखवाना ऐन मराठी हाकेनें भूमंडळ गाजविलें!' तेव्हां महाराष्ट्राचा सारा देदीप्यमान इतिहास एखाद्या विद्युल्लतेसारखा आपल्या डोळ्यापुढें चमकून जातो.

काशीची गंगा आणि रामेश्वराचा सागर एकत्र आणून शिवछत्रपतींनीं ज्याप्रमाणें रायगडावर 'गंगासागर' तलाव तयार केला, त्याप्रमाणें भारतीय संस्कृतीचें पावित्र्य आणि मराठी भाषेचें सौंदर्य एकत्र आणून गडकऱ्यांनीं आपला 'साहित्यसागर' महाराष्ट्रांत निर्माण केला.

एवढें सांगूनहि गडकऱ्यांबद्दल मनांत रेंगाळत असलेले ज्यांचे निरनिराळे गैरसमज दूर होणार नाहींत, त्यांच्या चरणावर 'गोविंदाग्रजां'नींच आपल्या हातानें 'फूल ना फुलाची पाकळी' यापूर्वी वाहून ठेवलेली आहे.

शहाजहानाच्या मेली
    ख्यालिखुशाली ती त्याची,
खडा तेवढा ताजमहालच
    भूषा जी या जगताची!
चुकल्या तरुणा, वेश्याक्रीडन
    आज तुझें स्मरणांत नसे
कालिदासकृत श्रीशाकुंतल
    सरस्वतीच्या कंठीं वसे!
दूषण वगळुनि भूषणमात्रें
    प्रभुपूजन करि काळ असें!
तुम्ही आम्ही कष्टी होणें
    हा कुठला मग न्याय असे?

या 'फुलाच्या पाकळी'नें तरी त्या 'चिंतातुर जंतू'च्या आत्म्यांना यापुढें शांति मिळो!

'शिवशक्ति'
विजयादशमी १९६१

प्रल्हाद केशव अत्रे

## याला साहस कोण म्हणणार नाहीं ?

.................

"तुला सांगितलें तर हसशील, पण—" पुढचे शब्द बोलणाराच्या तोंडातून बाहेर पडण्यापूर्वीच ऐकणारी व्यक्ति अधीर तुच्छतेनें म्हणाली, "मग सांगू नकोस वाटेल तर. मी तुझ्या या विरहकथा ऐकून कंटाळलों आहे. हा असला कसला 'रोमान्स'!"

"रोमान्स नव्हे रे; एक मजेदार कल्पना आठवली—"

"असेल, त्या पोरीकडे पाहूनच कीं नाहीं?" अधीर व्यक्तीनें पुन्हा मध्यें तोंड घातलें, "तें सारें 'रोमान्स'च्याच पंक्तीं."

यावेळीं वाचक उतावळेपणानें आम्हाला म्हणेल कीं, "प्लीज्, बेट ए बिट्—एक्स्प्लेन विथ रेफरन्स टु धी कॉन्टेक्स्ट. हें आता कांहींच उमजत नाहीं." ठीक आहे. वरील वाक्यांनीं झालेल्या अर्ध्या प्रवेशाचीं, स्थल, काल व पात्रें सांगून मग आम्ही पुढें लिहावयास लागू.

"आटपाट नगरच्या" आण्णुभाऊ दीक्षिताचे चिरंजीव हरिहर हेच आमच्या उघडल्या वाक्याचे उद्गाते होत. याची थोडीशी माहिती देऊन नंतर त्याच्या मित्राविषयीं बोलू. आपल्या गांवच्या "स्कूल फायनल" पसार होऊन हरिहर पुढील अभ्यासक्रम उरकण्यासाठीं मुंबईस—वाडींत येऊन राहिला होता. आज दोन वर्षें तो—शाळेंत मॅट्रिक्युलेशनच्या वर्गांत अभ्यास करीत होता. पहिल्या वर्षीं त्याला प्रवेश परीक्षेत 'बन्समोअर' मिळाला होता. परंतु एवढ्या वरून हरिहरच्या डोक्यांत धपाटे भरले होते असें मात्र कोणी समजू नये, उलटपक्षीं हरिहर, खरें म्हटलें असता, फारच बुद्धिमान् होता. त्याचें तें डोळ्यांत चमकणारें पाणी, बोलण्याची ऐट, अंगाची चळवळ—इतकें नकोच, नुसतें हरिहराकडे पाहिल्याबरोबर, त्याचा चुलता—वडिलोपार्जित मिळकतीवरचा अर्धा हिस्सेदार, अगदीं सख्खा चुलता मुद्दा नाइलाजानें म्हणत असे कीं

"मुलगा मात्र आहे खरा." आणि या चुलत्याला तीन मुलें—त्यातून एकतर अगदीं हरिहराच्या शीणेचा आणि हरिहराशीं "चाळीस साल व तोंडीस तोंड" देण्याकरिता दोन अडीच वर्षे मुबईस राहून अखेर गेला तसा परत आलेला! तेव्हां अशा चुलत्यानें हरिहराच्या बुद्धिमत्तेची वाखाणणी करावी यापेक्षा आणखी अनुकूल शिफारस ती कोणती पाहिजे? पहिल्या वर्षी हरिहर नापास झाला हें ऐकून त्याच्या गांवच्या "डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन" यांना किती तरी दिवस सखेदाश्चर्य वाटत होतें आणि त्या शाळेतल्या वरच्या वर्गातल्या मुलाना हा विषय एक आठवड्याच्या चर्चेला पुरून उरला होता. हरिहरला इग्रजींत फडाफड बोलतांना, उदाहरणातल्या 'डिफिकल्टिझ' ग्राम मिनाना समजावून देताना, प्रत्यक्ष हेडमास्तराशीं एकाद्या वादांत विरोधानें "डिस्कशन्" करिताना पाहून त्याच्या गावच्या पुढारलेल्या विद्यार्थि मिनाना—बिचारे ए व्ही स्कूल्चे तिसऱ्या-चौथ्या वर्गातले प्राणी—फार आश्चर्य वाटत असे आणि आपापल्या आयुष्यातल्या त्या वयाच्या भागासाठीं जो तो हरिहराचें "मॉडेल" काढून ठेवित असे. आता इतकें असूनहि हरिहराला परीक्षत 'डिच्चू' कां मिळाला याचें कारण आम्ही सागतों शाळू परिक्षातून उद्धरून आण्यासाठीं लागणारी तुटपुंजी गुणसरण्या मिळवून अधिक अशानीं शिक्षक राहाण्याइतकी बुद्धि हरिहराच्या डोक्यात खेळत होती. आणि या स्पृहणीय, कार्यकर, परतु कार्यामावीं स्वस्थ न बसता सापडेल त्या मार्गानें वाहवणाऱ्या शक्तीला नेहमीं कार्यव्यासगात गुतवून ठेवण्याइतकी व्यापकता आमच्या आजकालच्या शाळू अभ्यासक्रमात नाहीं हें या शिक्षणपद्धतीच्या अभिमान्यास सुद्धा कबूल करावें लागेल अमेरिकेसारख्या सुधारलेल्या प्रदेशातल्या शाळा पद्धतीकडे पाहून देखील मार्क ट्वेन या विनोदी लेखकाला असे उद्गार काढावे लागले कीं, "परमेश्वरानें प्रथम वेडे तयार केले, हें केवळ हात बसण्याकरितां झालें, मग कसलेल्या हातानें त्यानें 'स्कूल बोर्डे' निर्माण केलीं"* ही सुधारणादेवीच्या लाडक्या लेकराची दशा, मग आमच्या इकडच्या अनुकरण-पूर्ण शिक्षणाबद्दल काय बोलावें याचा—शातमथवा किमिहोत्तरेण!

अशा शिक्षणव्यवस्थेच्या ओघात अवजड घोंडे पार तळींच्या गाळात रुतावयाचे व तरत्या चिजा वहावल्या तिकडे वहावयाच्या, यात काय नवल! त्यातून हरिहर तर तरत्यातला तरता! त्याच्या बुद्धिमत्तेला ज्यादा वाचनात उनाडावयाला अवसर मिळाला मराठी लिहिता वाचता येऊ लागल्यापासन

* God first created idiots that was for practice then He created School boards —Mark Twain

हरिहर मर्लीकुर्री "गोष्टीचीं पुस्तकें" वाचीत आला होता. वजीरज्यादीनें सांगितलेल्या गोष्टी ऐकण्यासाठीं शहाजादा शहरियारबरोबर त्यानें एक हजार रात्री जागून काढिल्या होत्या, "नऊ रत्नां'च्या किंमती त्याला ठाऊक होत्या; "बाळमित्रा" बरोबर तो बागडला होता, "वीरमती" बरोबर त्यानें वाघाच्या शिकारी केल्या होत्या, "मदनमंजरी"ला सोडविण्यासाठीं तो वीरमणीबरोबर भटकला होता, "मंजुघोषा" आणि वसंतमाधव यांचा विरह घडवून आणण्यासाठीं दुभंगणाऱ्या बेटाच्या दोन्ही छकलांवर तो एकाच वेळीं हजर राहिला होता, विक्रमाच्या विमानाची एक खुंटी धरून शशिकला स्वर्गमार्गानें प्रवास करीत असता, दुसरी खुंटी धरून लक्कण्याच्या हरिहरानें तिला सोबत दिली होती; "कोल्हाम्याच्या मुली" बरोबर त्यानें दोरावर चालून दाखविलें होतें. "गोविंदराव बगल्या"नीं रात्रौ काबूबाईंना खोलींतून जाताना "दार ओढून घ्या" असें सांगितलें असताही काबूबाई जाताना आधीं लावलेली खोलीची कडी कां वाजली नाहीं या लोकरहस्याचा त्याच्या बालमनानें छडा लाविला होता, आणि त्याचप्रमाणें "धाकट्या सूनबाई"च्या पतिराजाबरोबर तो मर्दी जाळा वयासही गेलेला होता. सारांश, "जादूचा पलंग", "जादूचा सोटा," किंवा "पुणेरी मैना" यासारख्या छक्कड कादंबऱ्यापासून, "धाकट्या सूनबाई" "पण लक्ष्यांत कोण घेतो" यासारख्या फक्कड कादंबऱ्यापर्यंत तहत् सारीं पुस्तकें त्याच्या पूर्ण परिचयाचीं झालेलीं होतीं. कादंबऱ्या, प्रणयकथा, नवलकथा, नाटकें, प्रहसनें वगैरे भानगडींचा तो मराठीपुरता "मेकॉले" होऊन बसला होता. (मात्र संगीत नाटकें वाचितांना प्रथम तो पदें गाळीत असे व "विक्रमशशिकला" हें "शाकुंतल" पेक्षां वरच्या दर्जाचें नाटक असून "सत्यविजय" मान मराठींतलें पहिल्या प्रतीचें नाटक होय असं एकदा त्याचें मत असे ) मराठी सहाव्या इयत्तेंतून पार पडल्यानंतर इंग्रजी चांगलें समजू लागेपर्यंत जो काळ गेला तो हरिहरानें कवितेच्या वाचनांत घालविला. कवितेंत प्रणयरसाचा फारपणा किती असतो हें ज्याला ठाऊक नाहीं त्याला सांगून तरी काय ठाऊक होणार ? थोडक्याच काळांत हरिहर इंग्रजी वाङ्मयाकडे वळला आणि त्यातलीं किती तरी पुस्तकें त्यानें चारपाच वर्षांच्या अल्पावधींत वाचून टाकिलीं होतीं

याप्रमाणें हरिहराचें वाचन–उपवाचन म्हण हवें तर–फार दांडगे होतें. पण या विशाल व्यासंगाचा त्याच्या अल्लड मनावर भलताच परिणाम होत आला होता. ज्या जलवृष्टीनें मक्कम मूळांचीं झाडें फोफावतात, स्वच्छ होतात, तिनेंच कोवळीं रोपटीं कोलमडून पडतात—कधीं कधीं त्यांची सरळ वाढ बदलून तीं चक्रवाट गतीनें वेडींवांकडीं उगवतात, हा सृष्टिक्रम सार्वत्रिक आहे. प्रणयाच्या

वेड्यावाकड्या कल्पना हरिहराच्या कोमल हृदयात रुजून, इतस्ततः पसरणाऱ्या वनवेलींप्रमाणें परस्परांत गुंतून गेल्या होत्या. असें झाल्याबद्दल त्या बिचाऱ्याला कोणीं दोष मात्र देऊं नये. कारण हें सारें वाचन एकमार्गी होतें; त्याला चांगलासा निदर्शक मिळालाच नव्हता. शिवाय हें सारें मानसिक अन्न हरिहरानें चावून खाल्लेलें नव्हतें, नुसतें मिळालें तसें भराभर गिळलेलें होतें. दहाव्या वर्षीच त्याला प्रेमाची भाषा अवगत झाली होती. तिसऱ्या इयत्तेंत इतर लेंगड्यालेंगड्या पोरांबरोबर ड्रिलसारख्या पोरकट कामाकरितां आपल्याला जातांना, वर्गांतल्या दहा वर्षांच्या शांतीनें पाहिलें म्हणजे कल्पनेच्या वातावरणांतून रिंग्ल्साहेबाबरोबर परेड करणाऱ्या "लिटल्" पटवर्धनाची बालमूर्ति पाहणारे त्याचे डोळे लाजून खालीं पहात असत. चवथ्या इयत्तेंत आल्यावर, शांतीच्या हजिरींत, मार्कांसारख्या ऐहिक बाबतीबद्दल तो बेपर्वाई दाखवीत असे. तेराव्या वर्षी तो शेजारच्या सुंद्रीला "सुंदरी" म्हणून पूर्णव्यंजनी हाक मारूं लागला. (पुढें दोनतीन वर्षांनीं, कां कोण जाणे, 'सुंदरा' शब्दाचें त्यानें 'सुंदर' असें रूपांतर केलें!) चवदाव्या वर्षी समोरच्या रमाकाकूंनीं बोलतां बोलतां त्याची गुडघ्याएवढ्या पोरांत जमा केली यामुळें तो सबंध दिवसभर स्वतःशींच फुगून बसला होता—जणूं काय शरीराच्या लहानपणाला फटाळूनच!—आणि सोळा सतराव्या वर्षी तर तो प्रणयिनीवाचून प्रणयी झाला होता, विरहावाचून विरहव्यथा अनुभवीत होता. जग त्याला उदास भासत होतें, प्रेमशून्य जीविताला तो कंटाळला होता; त्याच्या बालमित्रांना प्रणयपाठाचे उतारेच्या उतारे ऐकावे लागत असत—त्या बापड्यांपैकीं एकाला त्यांतलें एक अक्षर कळत असेल तर शपथ!

दोस्त, हरिहराच्या या लांबलचक वर्णनानें तू अगदीं कंटाळला असशील नाहीं बरें? पण हरिहर माझ्या गोष्टींतला नायक आहे हें विसरू नकोस. असा कोण लेखक आहे कीं नायकाचें वर्णन करीत असताना कंजूषपणा दाखवील! शिवाय, हेंही लक्ष्यात ठेव कीं, हरिहराच्या राहत्या खोलीचें त्या खोलीसारखेंच चौकोनी वर्णन, तेथें अस्ताव्यस्त पडलेल्या सामानाचें तसेच अस्ताव्यस्त वर्णन, समोरच्या लांबलचक रस्त्याचें लांबलचकच आणि एकमार्गी वर्णन, किंवा तुझा माझा वाटेल तितका वेळ घालवून त्या वेळेचें वर्णन—सांग पाहू या ठराविक आचरटपणानें मी तुला त्रास दिला आहे का? नाहीं तर, वेड्या, नुसती कल्पना कर कीं, या साऱ्या बाजारबुणग्या "वर्णनाचें" जर सारखें सत्र उठविलें असतें तर तुला कसें नाहि भगवान करून सोडलें असतें तें!

काय म्हणतोस? मुळीं वर्णन करिता येत नसेल म्हणूनच केलें नसेल? नाहीं, तसें नाहीं. ती ताकद मान माझ्यात दणकून आहे "सकाळची वेळ!" किंवा "भयाण अरण्य!" अशा भनक्यानें एकदा सुरवात करून आजपर्यंत झालेल्या कादंबऱ्यातल्या त्या त्या वेळेच्या किंवा त्या त्या स्थळाच्या वर्णनांतून आळीपाळीनें, पहिलींतलें एक वाक्य, दुसरींतून दुसरें, तिसरींतून तिसरें पुन्हा पहिलींतून आठवें, नववें, काय असेल तें, असे वाक्याचे "वेंचे" घेऊ लागलों तर काय अनर्थपात करीन याची तुला कल्पनाही नाहीं.

## अचूक शरसंधान



जीवनार्थ कलहाच्या गडबडींतून कधींमधीं सापडणाऱ्या क्षणिक विश्रांतीच्या वेळीं, आपण जेव्हां विश्वकर्म्याचे अधिकार आपल्या हातीं घेऊन, आपल्यासाठीं भविष्यकाळाच्या पिंजर पायावर आपल्या वाऱ्यावरच्या जगाची इमारत उभारीत असतों तेव्हां आपल्या या पोरकट, आंधळ्या अभिमानाला, आपल्या पाठीशीं उभा राहून काळपुरुष निर्दय विनोदानें हासत असतो पुढें पसरलेल्या चंचल मृगजळाकडे बद्धदृष्टीच्या एकाग्रतेनें आपण सारखें पाहत राहत नसतों तर मागें वळून, आपल्याला काळाच्या हसत्या तोंडाकडे सहज पाहता आलें असतें, हृदयांत चाललेलें आशेचें कल्पनागीत ऐकण्यासाठीं चाफले कान सर्वस्वीं अंतर्वृत्ति होत नसते तर काळाच्या या अघोर हास्याचा भेसुर आवाज आपल्याला सहज ऐकता आला असता. पण आकस्मिक चमत्काराचा भुरळा

जगाचा नाटककार येत्या प्रवेशावर नेहमीं शक्यतेचा अंक पट (Drop Scene) पसरून ठेवितो. आंतली प्रवेशरचना होईपर्यंत, पात्र आणि प्रेक्षक या दोन्ही नात्यानें, वर्तमान क्षणावर वसलेल्या प्राणिमात्रानें त्या शक्यतेच्या अंकपटावर वाटेल तें चितारीत बसावें.

तारंग्याच्या पायथ्याशीं एका उतरत्या मैदानावर एक हरिणी एका झाडाच्या गर्द छायेंत विसांवत बसली होती. त्या शांत वेळीं झोपेनें अर्धवट तारवटलेल्या तिच्या डोळ्यापुढें अशींच आशेचीं चित्रें नाचत असतील; तिच्या डोक्यांत असले विचार येत नसतील असें म्हणवयाला, ती पशुकोटींतली प्राणी होती याखेरीज आम्हांला दुसरा काय आधार आहे? पशुवृत्ती सुखाच्या बाबतींत पशु मनुष्याच्या मागें खास नाहींत. प्रिय-सहवासाच्या किंवा अशाच दुसऱ्या कांहीं सुखमय कल्पना तिच्या मनांत त्या वेळीं खात्रीनें खेळत असतील; निदान भविष्यांत तिच्या दैवाची जी घटना चालली तिच्या कल्पना तरी तिच्या डोळ्यांपुढें खास नसतील; कारण, मग ती अशी स्वस्थ न राहती.

त्या उतरणीच्या डोक्यावर एक धनुर्धर, एक गुडघा जमिनींत रोंवून, धनुष्याची दोरी कानापर्यंत ओढून त्या हरिणीवर नेम रोंखीत होता. क्षणमात्रांत शरसंधान साधलें आणि धनुष्यावरचा बाण सूं आवाज करीत वाऱ्यांतून रस्ता कापीत चालला. आतां लागणार—झालें, लागला—पण खैर! चार-सहा बोटांनीं नेम चुकून तीर बरच्यावर उडून गेला आणि त्या झाडाच्या चुंधावर सालींत रुतून बसला. यमदूताच्या या चाहुलीनें साफ जागी झालेली हरिणी उठून उभी राहिली आणि क्षणमात्रही विचार न करितां सारखी चौपायीं पळत सुटली. एक झडप, एक वारीकशी दौड आणि पाय पोटाशीं धरून एक उडी—धनुर्धराला दुसरा बाण जोडायला सुद्धां वेळ मिळाला नाहीं. त्या उडीसरशीं चांगलें दहावीस हातांचें अंतर—अरेरे! धनुर्धराच्या डाव्या हाताजवळच्या एका झुडुपांतून सुटलेला एक तीर उंच उडालेल्या हरिणीच्या कुशींत घुसला आणि बिचारी कायमची खालीं पडली. धनुर्धरानें त्या झुडुपाकडे पाहिलें. झुडुपाच्या मागून दुसरा एक धनुर्धर उठून उभा रहात होता.

· २ ·

तारंग्याजवळच्या गजेंद्रगडचे गिराहदार महीधर वयानें पन्नशीच्या सुमाराला येऊन पोंचलेले होते; परंतु आपल्या स्थूल देहामुळें साठिशीच्या शींवेपलीकडे गेलेले दिसत. स्थूलदेही, स्थूलबुद्धि, सुखांत वाढलेले, वर्णानें काळेसांवळे, मोकळ्या मनाचे, बोलण्यांत अघळपघळ—सारांश, महीधर कोणाला फारसे आवडत नसले तरी ते कोणाला अप्रिय मात्र खास नव्हते. बिचारा

अगदी सामान्य मनुष्य—शत्रूचीसुद्धां शक्य न घेणारा. अंगीं कोणताही विशिष्ट गुण लोकोत्तर प्रमाणावर तर नव्हताच, पण एखाद्या सरोवरीच गुणी मनुष्याशीं स्पर्धा करण्याला लागणारी अहमन्यता लागते ती सुद्धा त्याच्या अंगीं नव्हती. यामुळें खुल्या दिलाचे महीधर परगुणाचें मोकळ्या मनोभावानें कौतुक करीत, गुणाचें वर्चस्व कबूल करीत, इतकेंच नाहीं तर गुणी मनुष्यासमोर आपली श्रीमती विसरुन ल्युनृत्तीनें वागत. कोणाच्याही अंगीं कांहीं विशेष गुण दिसताच महीधर त्याचे स्तुतिपाठक बनत. त्याच्या लहानशा गिराईतले लोक त्याच्या अमदानींत मोठ्या सुखानें राहत होते. नोकरचाकराचीसुद्धां दयाशील महीधरांच्या रागाचा शेवट नेहमीं क्षमेतच व्हावयाचा ही खात्री होती. तात्पर्य, जगाकडून खुशामतीची परवा न करितां, आपल्याला खुशी व्हावयाचें असेल तर आपण सर्वांना खुशी ठेविलं पाहिजे अशा समजुतीचीं जीं निरुपद्रवी मनुष्यें जगात कधीं कधीं दृष्टीस पडतात त्यापैकीं महीधर होते.

पहिली पत्नी परलोकवासी झाल्यामुळें चारपाच वर्षांपूर्वी महीधरानीं द्वितीय विवाह केला होता आज रुक्मिणी एकोणीस वीस वर्षांची असेल. जोडा वयोमानानें फारसा अननुरूप न हता तरी रुक्मिणीच्या नाजुकपणामुळें आणि महीधराच्या ओबडधोबड आकारामुळें अगदीं विसंगत दिसे लग्न झाल्या दिवसापासून सुंदर, उल्हासी आणि तरतरीत रुक्मिणीची वृत्ति सारखी बदलत गेली कुसकरलेल्या जाईच्या कळिकेप्रमाणें तिची शोभा कोमेजत गली होती. आजारी नसताही तिचा चेहरा निरतेज दिसत असे. बाल्यवयाची उल्हासवृत्ति मावळून तिच्या जागीं वृद्धपणाची सखेद उदासीनता आली होती. कोणतेंही काम ती निर्जीवपणानें करीत असे. ती महीधराचा द्वेष करीत असे किंवा त्याच्या सहवासाचा कंटाळा करीत असे असें मुळींच नव्हतें. लहानपणीं कोणावर प्रेम बसून पुढें निराशा झाली अशातलाही प्रकार नव्हता. उलट महीधरावर तिचें प्रेम—किंवा भक्ति म्हणें तर विशेष योग्य—होती महीधर नेहमीं आपल्या पत्नीला सुखात ठेवण्याचा प्रयत्न करीत, आणि रुक्मिणीही या त्याच्या प्रयत्नाचा तिरस्कार करीत होती असें नव्हतें. पण तें सुख निर्जीव, तें हसणें निर्जीव, तिच्या आयुष्याचा ओघ एखाद्या कालव्याप्रमाणें ठराविक गतीनेंच वाहत असे, एखाद्या नदीच्या ओघातल्या चढउताराचा जिवंतपणा त्यात नव्हता. आणि हें सारें होण्याचें कारण असें कीं तिचा पति तिच्या गुणाना, रूपाला व मनोवृत्तींना अनुरूप नव्हता पण या प्रकाराची तिला यथार्थ जाणीव झाली नव्हती. जो काहीं परिणाम झाला तो तिचा तिलाही न कळत, यामुळें महीधराबद्दल द्वेष, तिरस्कार किंवा नावडही तिच्या मनात मुळींच उत्पन्न झाली नाहीं. याप्रमाणें रुक्मिणीच्या हृदयाची विपण्ण स्थिति झालेली तिला सुद्धां कळून येत गेली नाहीं, मग

बिचाऱ्या जडबुद्धीच्या महीधराला काय कळणार ! रुक्मिणीची ल्हानपणची उल्हासवृत्ति, तरतरी, बुद्धिमत्ता वगैरे पाहिलेले लोक मान म्हणत की मोठ्या घरी पडल्यामुळे रुक्मिणीनें आपल्या पदवीला साजेलशी गंभीरता धारण केली हें योग्यच झालें. अरेरे, बिचारी लोकवार्ता ! कळो न कळो, प्रत्येक बाबतींत, तिचें आपलें साधेभोळें मत हें ठेविलेलें ! मनातल्या मनात सारखी मरत चाललेली रुक्मिणी मान कडाकडेही लक्ष न देता, निरक्तवृत्तीनें मुखदुःखातून जीवन कठीत होती, किंवा तिचें विरुद्ध वा वर्तीनें मत घेतल्यावाचूनच, काळाच्या ओघानरोनर तिच्या आयुष्याचा ओघ वाहत होता. योग्य पोषण न झाल्यामुळें रुक्मिणीचें बाळपण सारखें सरत चाललें होतें, कसलाही हेल्कावा मिळाल्या वाचून व परिस्थित जगाविषयीं उदासीन वृत्तीनें राहून आपल्या ठायींच कालक्षेप करणाऱ्या वाङ्कायनातून वाळू जशी अव्याहत पडत असते तशी रुक्मिणीच्या हृदयातून जीवनवृत्ति सारखी झरपून जात होती. महीधराचे तिच्या सुखाबद्दलचे प्रयत्न, मरणाविषयीं खात्री झालेला हताश रोगी ज्या विषण्ण हास्यानें आप्तेष्टानीं दिलेलीं औषधें घेतो त्या हास्यानें ती मान्य करून घेत असे.

• ३ •

आज नागत महीधर रुक्मिणीला आपण आणलेली शिकार—आपली ती मेलेली हरिणी—दाखवीत होते. नेम चुकविणारे धनुर्धर म्हणजे आमचे महीधरच होते हें आता सागावयास नकोच. जवळच तो यशस्वी धनुर्धर अदबीनें उभा होता. वयानें बावीस तेवीस वर्षांचा, नेहमीं किंचित् स्मित करणारा, डोळ्यातल्या चमकेनें बुद्धिमत्तेची साक्ष पटविणारा, रोमारोमातून त्या जीवनपणानें तरतरी दाखविणारा, मर्दानी बांध्याचा, कोंवळ्या बाळपणावर मर्दुमकीचा किंचित् कठोर मुलामा चढविणारा, सूर्यतापानें पिंवळट गोरेपणा थोडासा करपल्यामुळें आपला पेशा जाहीर करणारा—एकदरींत, एकाद्या तरुणीच्या डोळ्यानीं त्याच्या मोहकतेकडे पाहणें म्हणजे बरेंच धोक्याचें होतें.

आपले दिलदार गिरासदार रुक्मिणीला त्याच्या पराक्रमाचें वर्णन ऐकवीत होते.

" रुक्मिणी, हा आपल्या शालपूरच्या जेसग जमीदाराचा मुलगा पराग (प्रयाग ) यानेंच ही हरिणी मारिली. माझ्या बाणानें मी बसलेल्या हरिणीला पळावयास लाविलें, पण यानें आपल्या बाणानें पळती शिकारसुद्धा जमीनदोस्त केली "

दुसऱ्या गुणाच्या वर्णनासाठी स्वताची कमी किंमत करिताना उदार वाणीच्या महीधराला मुळींच सकोच वाटला नाहीं.

रुक्मिणीनें वैभवाच्या जाणीवेनें हसत हसत तें बोलणें ऐकिलें तरुण दृष्टीच्या कौतुकानें तेजस्वी धनुर्धराला न्याहाळीलें आणि स्त्रीहृदयाच्या करुण दृष्टीनें मृत हरिणीकडे पाहिलें स्मितपणानें हसत ती म्हणाली, "हें अचूक शरसंधान कौशल्याचें तर खरेंच, पण पुरुषांना आपलें कौशल्याचें प्रदर्शन निर्दयपणातच का बरें करावें लागतें!"

कोमल हृदयाच्या या हृदयभेदी प्रश्नामुळें अल्लड तरुण विरमला, शरमला आणि सापराधवृत्तीनें खालीं पाहू लागला मोठे महीधर आपल्या लाडकीच्या दयाळूपणाचें कौतुक करण्याकरिता हसले

रुक्मिणी, तुझ्या या प्रश्नाचें उत्तर बिचारा पराग काय देणार? जगाच्या आरंभापासून पुरुष कठोरतेचा मालक होऊन स्त्रीकडे कोमलतेचा वाटा आलेला आहे पुरुषाचा पराक्रम एखाद्याला जखमी करण्यात पहावयाचा आणि स्त्रीचा पराक्रम जखमी मनुष्याला बरं करण्यात पहावयाचा देवी मानवतेचा स्वभावच होऊन बसला आहे! एक हृदयाचे दोन तुकडे करण्याकरितां पुरुष जन्माला आला आहे आणि दोन हृदयांना एकजीव करण्याकरितां स्त्रीजातीचा अवतार आहे! देवी मानवते, पुरुषार्थाचें प्रतिबिंब समरांगणावरच्या रक्तप्रवाहात पहावयाचं आणि स्त्रीत्वाच चित्र एकांतातल्या अश्रुप्रवाहात पहावयाचें अशी पक्षपाती दृष्टि तू कधीं बरें बदलणार?

त्या अनाथ, मृत हृदयावर स्त्रीहृदयानें एक अश्रु टाकिला! कोणत्या तरुणानें तो अश्रु आपल्या हृदयात साठवून ठेवण्यासाठीं हृदय द्विधा करून घेतलें नसतें? विधात्या, अश्रु निर्माण करण्याची कल्पना तुला कोणीं बरें दिली? खचित त्या हरिणीच्या जागीं एखादा हरीण असता तर पुन्हा सजीव झाला असता!

वेडे तपस्वी! अमृताच्या आशेनें स्वर्गप्राप्तीसाठीं तपश्चर्या करीत बसले आहेत! ज्ञानाची ही दशा! मग बिचाऱ्या व्यवहारी जगाला काय हसायचें? मोतीं काढण्यासाठीं जग सहजच समुद्रतळींच्या चिखलात बुडया मरीत बसणार!

"पाहिलेंस, एका गरीबीनें मनुष्य किती मागे पडतो तें! या आपल्या तारग्याच्या तालुक्दारींत याच्या तोडीचा तिरंदाज नाहीं स्वभावानें उमदा लिहिण्यावाचण्याचाहि याला मोठा शोक! आपले मोरजी (पुरोहित) याचे नेहमीं गोडवे गातात इतकें असूनही आज हा आपल्या दृष्टीस पडत आहे!"

आपली स्तुति ऐकण्याचा कंटाळा करणारा पराग शालीनतेनें खालीं पहात होता मधून मधून ओशाळल्यासारखाही दिसत होता

एक सुस्कारा टाकून रुक्मिणी म्हणाली, "गरिबीचा आम्हाला लहानपणीं चांगलाच अनुभव मिळाला आहे! बाबांना आपल्या भेटीसाठीं गिरासीत यायला कितीतरी यातायात पडत असे"

महीधर पुढे म्हणाले, "रुक्मिणी, मी आता याला शिकारवर ठेवूनच घेणार आहे. पराग, रहाणार ना तू आजपासून आमच्या तैनातीत?"

तीर तरवारीचे ते दिवस. शहाकुळीचा, जन्मकाळाचा परिणाम त्या वेळी चिरजीव होत नसे नशिबाच्या घोडदौडीवर बेलगाम फेरफटका करण्याची सवड असल्यावर आपण होऊन जेरबंदानें बंदिस्त कोण होणार? चारा प्यारेसे वासरूसुद्धां सुरासमाधानानें गळ्याला दावें लागू देत नाहीं, मग तारुण्याच्या पठारीवर वागडलेल्या परागानें तैनातीच्या खोड्यांत पाय अडकविण्याचें दूरच राहिलें.

विनयशील बाणेदारपणानं पराग म्हणाला, "सरकारसेवेसाठीं तैनातीतच पडाला रहावयाला हवें! ठाकूरश्री किंवा ठकराळा (ठाकुराणी) म्हणतील त्यावेळीं मी पायाशीं हजरच आहे."

परागच्या तरुण मनातलें तारतम्य ओळखून तें मोठ्या मनाचें जोडपें मनापासून हसलें. महीधरांनीं सांगितलें, "बरें, तुझ्या मनास येईल त्याप्रमाणें कर. पण दरघडी वाड्यात मात्र येत जा! आणि आज आता घरीं जाऊ नकास, जेसग जमीदाराना मी सांगून पाठवितो."

रुक्मिणीनेंही असाच आग्रह केला. पराग त्या दिवशीं गिरासवाड्यातच मुक्कामाला राहिला. एका दिवसाच्या सहवासातच त्या नवराबायकोच्या मनमोकळेपणानें परागच्या गरीबीनें संकोचवृत्ती कितीतरी सोडून दिली.

## झेलम कादंबरी

****************

### १. पात्रें

झेलम : नायिका
सिंधु : The suffering victim
नर्मदा : The fallen widow
शरयू : suffering widow कराळून जीव देणें
नीरा given to शकु daughter to, trait देणें विनोद
माजरी (मस्तानी) : sister to शकु. नागझरी
दादासाहेब दीड शहाणे Husband to नर्मदा
नानासाहेब नवरे finally married to झेलम्

वसुसाहेब कावळे : father to the Hero रत्नाकर
भय्यासाहेब भोळे : Husband to सिंधु
अप्पाशास्त्री आरोळे . The worthless शास्त्री
बजरंग : son to आप्पाशास्त्री
शकु : A personality
रत्नाकर : son to कावळे, The Hero
अण्णासाहेब आचरट : A wellknown rascal (शरयू नर्मदा)
शांताराम : son to भाऊसाहेब भगग
भाऊसाहेब भगग : father to शेलम्
शौनक
हरमट हलके वगैरे तीर्थस्थ मंडळी

## २. कांहीं प्रकरणें

अमंगलाचरण

| | | | |
|---|---|---|---|
| १ | पगारच्या सोंगऱ्या | १८ | तारावाचून तारायंत्र |
| २ | नशिबाची शर्यत | १९ | विलायतेची बोट जमिनीवर बुडाली |
| ३ | व्यंकटगिरीस | | |
| ४ | धर्म | २० | पश्चात्तापाच्या पुढे |
| ४ अ | पश्चात्ताप | २१ | ठरलें |
| ५ | तारुण्य | २२ | सेकंड-हॅंड सामान |
| ६ | लक्ष्मी | २२ अ | शरयू |
| ७ | विद्या | २३ | तीर्थावरचे कावळे |
| ८ | अक्कलेचा सौदागर | २४ | हृदयत्रिपुरी |
| ९ | रसिक मनुष्य | २५ | पश्चात्ताप परिपूर्ण |
| १० | शुभलग्न सावधान | २६ | त्यातल्या त्यात—पण आधींच ! |
| ११ | शुभलग्नाच्या पुढें | | |
| १२ | पुढें—पण दुसरीकडे | २७ | बापरे, या बोलायच्या गोष्टी ! |
| १३ | विद्या, वैभव आणि धर्म | २८ | बजरंगाचें ब्रह्मचर्य |
| १४ | चतुर्थे सत्यम् | २९ | नर्मदेचा ओघ |
| १५ | धर्मोपदेश | ३० | काळी कपिली |
| १५ अ | शौनक | ३१ | शकु, शौनक व शरयू |
| १६ | भले मालोजीराव ! | ३१ अ | धर्म व व्यवहार |
| १७ | शुभलग्नाची उजळणी | ३२ | त्रिकालदर्शी आरसा |

| | | | |
|---|---|---|---|
| ३२ अ | शरयू समुद्राला मिळते | ४१ | नादखुळामुळें ! |
| ३३ | मागितलें दान कसें पडलें | ४२ | नर्मदेनें काय करावें ? |
| ३४ | नवलाखाचें एकच मोती | ४३ | एक क्षण |
| ३५ | शौनकाचा इतिहास | ४४ | शाबास, शौनक ! |
| ३६ | अग्निहोत्राची गडबड | ४५ | कोमलतेचीं फुलें |
| ३७ | नव्या जमान्यांतला इंग्लेर | ४६ | वेतावर आलें ! |
| ३७ अ | शौनक पुढें होतो | ४७ | टोप्या फिरविल्या |
| ३८ | शंकूचा प्रोग्राम ! | ४८ | अग्निहोत्राच्या ज्वाळा |
| ३९ | इजा, बिजा आणि तिजा ! | ४९ | शौनकानें केलें काय ? |
| ४० | धर्मांचा डंका | ५० | सार्थक झालें ! |

मृत्युपत्र

३. कांहीं कल्पना

शंकूच्या कल्पना—स्त्री होणें. परमेश्वर माणसें कशीं उत्पन्न करितो—स्वर्गांत दाटी फार असणें—मारुतीसारखी भक्ति—स्वर्गाच्या वाटेवर दाटी नसते—अरे दोस्त हम् पाठवेंगा.

झेलम—आरशासमोर असतांना तिच्या गालावर अश्रु पडतो—माझ्या प्रेमसंन्यास नाटकाबद्दल एकानें सांगितलें, अश्रु शब्द येतो—एकानें म्हटलें मयाण शब्द फार वेळां येतो—

—लग्न ठरलें म्हणून रडते ?—हिंदु मुलीला हृदय तरी आहे का—मुलीनें जेवतांना बोलायचें नाहीं; नाहींतर त्या शरयूला विचार—शरयू कोण ?—एक बालविधवा—वगैरे

—शौनक शेवटीं नर्मदेचा स्वीकार करितो—पतिताच्या सहवासानें मी पडेन असें मला वाटत नाहीं;—

—परमेश्वर सोंगट्या खेळतो—निकालाचे फांसे—बुद्धिबळें खेळत नाहीं—

—अजागळ वाचक आ पसरून कसा उभा राहतो—

—शौनक: माझ्या कृत्यांत स्वार्थाचा अंश होता म्हणून तर त्याला यश आलें नाहीं.

—जयंताची व शौनकाची भेट—द्वितीयेचा चंद्र.

—वाचक, नर्मदेशीं समजूत करायला जवळ जाऊं नकोस; नाहींतर मोहांत पडशील.

# अगदीं साधी कहाणी



सिंधु आज सकाळपासून एकीकडे बसून सारखी मुळमुळ रडत होती का बरें? मधुदादानें 'बाळमित्रा'चें पुस्तक तिला दिलें नाहीं म्हणून? चिमुरड्या मनुताइनें तिच्या लॉकरीची गुतागुत करून ठेविली म्हणून? शेजारच्या बाळासाहेबानीं झुद्धिबळें खेळताना तिच्यावर प्यादी केली म्हणून? पुढल्या घरच्या कमळाताईनें बाहुलीच्या लग्नात तिला "वरमाई, विहीणबाई" म्हटलें नाहीं म्हणून? भातुकलीच्या दिवाळींतल्या चिमुकल्या करंज्यासाठीं आईनें इवलेंस सारणपुरण दिलें नाहीं म्हणून?

छे तसातलें काहीं नाहीं अनोळखी वाचक! हा "छे" म्हणण्यापूर्वी विरक्तवृत्तीनें मी जो दीर्घ श्वास आत घेतला हा "छे" म्हटल्यानतर मी जो दीर्घ नि श्वास बाहेर सोडला तो दीर्घ श्वास—तो दीर्घ नि श्वास—मनातून जनात मिरविण्यासाठीं अवतरणाऱ्या माझ्या उदासीनतेच्या स्वारीचे हे आघाडी पिछाडीचे स्वार, अनोळखी—पण मनोवृत्ति ओळखणाऱ्या वाचक—जर हे स्वार तू पाहिले असतेस तर माझ्या मनाची उदास छाया तुझ्या तोंडावर उमटली असती, तुझ्या मनावर बठली असती, तुझ्या मनाची चलबिचल झाली असती, मी काय बोलणार हें तुला एकदाच ऐकून कळलें नसतें आणि तुझी समवृत्ति झाल्यानतर तुला नीट समजण्यासाठीं मला पुन्हा एकदा म्हणावें लागलें असत कीं—

छे तसातलें काहीं नाहीं! एवढ्याशा गोष्टीवरून ती सकाळपासून आता पर्यंत—चांगले दोन तास—सारखी रडत कशाला बसल? आणि एवढ्याशा गोष्टीवरून रडत बसण्याइतकी ती आता लहान का आहे? आज तिला काहीं नाहीं तरी पधरावें वर्ष असेल आता ती लहान कशाची? बाकी ती अजून लहानच असती तर—तर—या "तर"च्या पलीकडे सारें ब्रह्मांड आहे! पण तिच्या पलीकडे आजपर्यंत गलें आहे कोण? आणि यापुढें जाणार आहे तरी कोण? वाचक, तूही नाहींस आणि मीही नाहीं! आणि आता सिंधूही नाहीं! तुझ्यामाझ्याप्रमाणेंच सिंधूलाही आज तिचें बालब्रह्मांड पारखें झालें आहे! चल, सोड एक उदास उसासा, टाक एक अमोल अश्रू त्या तुमच्या आमच्या मावळलेल्या बाळसूर्यांच्या अध्यासाठीं आणि त्याच्या स्मृतिरूप संध्येवरून आपली अश्रुपूर्ण नजर सिंधूच्या अश्रुपूर्ण मुखमंडळावर! वाचक, आता तुझ्या दृष्टीसमोर लाली दिसते ती बाळसूर्याच्या स्मृतिसंध्येची नाहीं

पण सिंधूच्या रडून रडून लाल झालेल्या गालावरली! काय, तुला तिचें रडवें तोंड पाहवत नाहीं; मग चल आपण जाऊन तिची समजूत करण्याचा—हो, पण हें सांगायचें राहिलेंच आहे कीं सिंधु आज रडते का? सांगू आतां ती का रडते?

आज तिचें लग्न ठरलें म्हणून!

हें वर्णन कादंबरींत नर्मदेबद्दल येणें

## तोड ही माळ

.................

श्रीग वंदे !

तोड ही माळ

एक सामाजिक नाटक

लेखक :

राम गणेश गडकरी

मुंबई १९१६ ऑगस्ट ता. २



### अर्पणपत्रिका

सर्पजातीला फुलांचा वास फार आवडतो<br>
असें पुष्कळांच्या तोंडून<br>
ऐकिलें आहे,<br>
म्हणून<br>
केवड्याच्या वनांत दडलेल्या<br>
नागिणीची<br>
या तुटलेल्या माळेच्या फुलांनीं<br>
पूजा बांधून ठेवीत आहे.

राम गणेश गडकरी

## मंगलाचरण

ज्या प्रेरणेनें
चिखलाच्या गाळात जन्म घेणारी कमलिनी
आकाशस्थ पवित्रतम तेजोनिधीकडे
आपलें मुखमंडल आशेनें लाविते—
आणि
आकाशात जन्मलेली वीज खालीं
मातींत पडून मातीमोल होते—
अशा त्या गूढस्वरूप
स्वभावधर्माला
हें आश्चर्यपूर्ण वंदन असो.



श्री

# तोंड–ही–माळ

## प्रवेश पहिला

[पौर्णिमेची संध्याकाळ. आउट हाऊससमोरील बाग. चबुत्र्यावर तरु बसली आहे. मागें दरवाजाचा पडदा दोन्ही बाजूस सरकवून शामल तोंड काढितो.]

तरु : इकडे चंद्र, इकडे चंद्र (मागें पाहून) अगबाई, आणि इकडेही चंद्रच!

शा : तरु, आज चंद्राचा सहस्रजप मांडिला आहेस वाटतें!

तरु : शामल, मी मोठ्या बुचकळ्यात पडलें आहे; आज आकाशात चंद्रांची सभा तर थाटली नाहीं ना!

शा : म्हणजे!

तरु : आज पौर्णिमेची संध्याकाळ! हा पहा पश्चिमेकडे तांबड्या अबरणावर बसलेला चंद्र; हा पूर्वेकडे तशाच देखाव्याचा दुसरा चंद्र! अशा रीतीनें उगवत्या मावळत्या चंद्रसूर्यांची चूकभूल होऊन मला

पूर्वपश्चिमेचें कोडें पडलें; घराच्या खुणेवरून उत्तर ओळखण्यासाठीं मागें पाहिलें तरी—

शा. : मलतेंच उत्तर मिळालें ?

त. : मागें गुलाबी पडद्यातून डोकावणारा तुझा मुखचंद्र ! म्हणून म्हटलें, तू विलायतेस जाण्याची बातमी चंद्रलोकापर्यंत पोंचून, आमच्या आजच्या चिमुकल्या समारभात भर टाकण्यासाठीं कुबेरभांडारींची सारी चंद्रावळच खालीं उतरावयाला लागली कीं काय ?

शा. : मुखाला चंद्राची उपमा देणें जर मला आवडत असतें तर मी तिथूनच तुझ्या कोड्याची समस्या पुरी केली असती !

त. : ती कशी काय ?

शा. : दक्षिणेकडे माझ्यासमोर दिसणाऱ्या तुझ्या मुखचंद्राची या तीन चंद्रात भरती केली असती आणि हा चार चंद्राचा चौक चारी दिशाना वाटून, आपल्या या मध्यलोकाला—स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ यानीं उभारलेल्या तिमजली इमारतीच्या दुसऱ्या मजल्याला ईश्वराचा आरसेमहाल ठरविलें असतें ! पण, मुखाला चंद्राची उपमा देणें मला मुळींच आवडत नाहीं !

तरु : का ? सुंदर मुखाला चंद्रापेक्षा दुसरी कोणती उपमा साजणार ?

शा. : चंद्रासारख्या गोल चेहऱ्याचीं माणसें माझ्या दृष्टीला मुळींच सुंदर दिसत नाहींत.

तरु : आणि मग दिसतात कोणतीं ?

शा. : लंबवर्तुळ, उभट चेहऱ्याचीं !

तरु : मग गोल चेहऱ्याचीं माणसें सुंदर नसतात असेंच झालें ?

शा. : निदान माझ्या दृष्टीनें तरी खास ! सौंदर्याची—विशेषतः स्त्रीसौंदर्याची कल्पना करण्यासाठीं मला प्रथम चागला सुंदर—चेह. सहजसुद्धा माझी आवड आपोआप तोंडीं येते—प्रथम चागला सुंदर लंबवर्तुळ चेहरा पुढें उभा करावा लागतो. इतर गोष्टींकडे मी त्यानंतर लक्ष देतो.

तरु : ही तुझी सौंदर्याची कल्पना फारच आटोपशीर होत नाहीं का ?

शा. : तरु, सौंदर्याची काटेतोल व्याख्या करणें शक्यच नाहीं ! कवितेप्रमाणेंच सौंदर्याची कल्पनाही ज्याच्या त्याच्या आवडनावडीप्रमाणें बदलत असणार !

# कथाशेष (उपोद्घात)



देशावरतीं अंधाराची अर्धी काळी छाया ॥
व्यापि जिवाला आठवणाची अचुक उद्दाम माया ॥
प्रेमकथा ही ऐकायाला नको रिकामा कान ॥
ज्याची त्याला दखलसाची मुक्या मनाची तान ॥
उदास संध्याकाळ, भोवती वारा वाहे कुंद ॥
चढे शाहिरी शराब झाला गोविंदाग्रज धुंद ॥
एक मनाच्या मरजीसाठीं प्रीतीचा इतिहास ॥
लिहुनि ठेविला रसिक वाचका, खुशाल त्याला हास ॥

# कथाशेष : संदिग्ध व्यक्ति



पुढं रुणकत वाजत गाजत आला पाउसकाळ ॥
हिरवळले त्या काळीं सगळे मिरजमळ्याचे माळ ॥
नाच परोपरि करि बिजलीची वर लखलखती घाई ॥
मीनांनें डोळ्यात तुझ्याही खेळे ती चपळाई ॥

शीतल जलकण तनुवरि उडवी शीतवात निजरंग ॥
किंचित् भिजलीं, गारठलींही अपुलीं विव्हळ अंग ॥
निकट, निकटतर सरलीं—नकळत अंतर विरल्या गलें ॥
उष्णश्वासें परस्परांचें शीत निवारण केलें ॥

स्त्रीहृदयाची संकोचवृत्ति कोमल तितकी क्रूर ॥
प्रसंग साधुनि करी विरस मग लावि मनिं हुरहूर ॥
चुकल्या चित्ता चुटपुट लागे, हृदय सशल्य झालें ॥
सीमारेषा निरसिल्या न तों, इंद्रचाप मावळलें ॥
पुन्हा मनाच्या जगात आली कितीकदा ती वेळ ॥
एकसारखा घरी आपुला झाला तितका खेळ ॥

झालें असतें काय दुज्या क्षणिं नच त्याची जाणीव ॥
अवघड कोडें हुडकायातें करीत धडपड जीव
क्षणचि आणखी एक, शब्द या एक, दृक्सान्त ॥
जरी लाभता तरी हा चुकता असा मनाचा घात ॥
उंच पठारीवरी धांवतां फुलपांखरामागें ॥
हात सरकला पुढें—अरेरे—पंखहि हातां लागे ॥
तोंच तेथुनी कडा लागला, तें सरतें पाऊल ! ॥
दुरुनि तरळतें फुलपांखरू पाहि दृष्टिला भूल ॥
अधांतरीं तें भिरभिरतें मग, अंतर नसतां फार ॥
नडावलेल्या जिवास भासे परि तें नानाकार ॥
विश्वासाच्या लहरींवरतीं दूर तरंगत जाई ॥
उदास ओसाडीच पुढें ती वरती खालीं पाही ॥

## जुन्या प्रेमास—

••••••••••••••••

प्रेमाचीं मापणें परिसतां किंवा वदतां तद्विषयीं ॥
तुझी स्मृति क्षणमात्र होत मज, लहरी नाचवि जी हृदयीं ॥१॥
तुटला आतां ऋणानुबंधचि—कुणी कुणाचें जरि नाहीं ॥
तरी न विसरे जीव—आपुलें गूढ असें जें मनिं कांहीं ॥२॥
रविकिरणानें कमळ विकसतें—कधीं कुठें तरि केव्हांही ॥
किरण मरे तें—कमळहि नाहीं—परि झालें तें नच नाहीं ॥३॥
जें झालें तें चित्रगुप्तही लिहून ठेवी स्वर्गात ॥
स्वच्छंदाची जी देवी ती जल्पंतीही तें गात ॥४॥
नवीं बंधनें तुला लाभलीं—आणि लाभतिल तशीं मला ॥
परंतु गेली पहिली प्रीति—प्रीती प्रतिपच्चंद्रकला ॥५॥
व्यवहाराची बुद्धि मन्मना तुजपासुनी ओढुनि नेई ॥
मदिरेची ही भ्रष्ट दिव्यता स्वतंत्रता मजला देई ॥६॥
प्रेमाचें तें चरित्र जेव्हां आम्ही चालू केलें ॥
आम्ही रडलों, जग हंसलें—परि जें झालें तें झालें ॥७॥

# विरे जळिं गार...



विरे जळिं गार ॥ झडपिला घारिनें हार ॥

गेल्या रात्रीं खेळत होती ॥ गात्रीं, नयनीं, हृदयावरनीं ॥
नाचत रोमारोमाभंवतीं ॥ सखे ती लाज ॥
कुणीकडे पळाली आतां ॥१॥

तुडुनी ज्याचें बंधन बाई ॥ लेश न बाळपणाचा राही ॥
पडलें थोरपणाच्या डोहीं ॥ लज्जाजाल ॥
हरपलें कालच्या काल ॥२॥

लाजवि स्मृतिही ज्या रात्रीची ॥ नुसत्या कल्पनेंत चित्रींची ॥
हरुनी लज्जा माझ्या मनिंची ॥ रात्र ती मेली ॥
हें काय करोनी गेली ॥३॥

डोळा मिटतां त्या डोळ्याला ॥ रंगनि बघतां बघतां गाला ॥
रोमांच्यांच्या कांट्यावरला ॥ सदाचा ताजा ॥
कुणि गुलाब नेला माझा ॥४॥

थरथर नाचत हृदयाभंवतीं ॥ लावि नजरहि पायावरती ॥
खिळवि जागिंच मारुनि मज ती ॥ कुठें ग आज ॥
चोरट्या मनाची लाज ॥५॥

रात्रीं होतें अजाण पोर ॥ एका रात्रींत झालें थोर ॥
माझ्या बाळपणाचे चोर ॥ बाई फार ॥
नयनांचे जादूगार ॥६॥

हंसत हासत मंदिरीं आलें ॥ बाई मी तर पत्थर झालें ॥
हृदयावांचुनि कांहिं न हाले ॥ चाले श्वास ॥
हालवी फार हृदयास ॥७॥

गात्रीं, नयनीं, ओठावरती ॥ नाचे मुक्या प्रीतिची भरती ॥
चमकति घर्मबिंदु तनुभरतीं ॥ नव नवलाची ॥
लाज ती नव्या नवलाची ॥८॥

... ... ...

करुनी शिणगारचा भडिमार ॥ हरी तें केलें ॥
मग हृदया कांपरि नेलें ॥९॥

लवाड हात पसर्वे तसलें ॥ माझ्या ओठावरही वसलें ॥
बाई तयानेंच मी फसलें ॥ असें हें झालें ॥
मी बाळपणाला मुकलें ॥१०॥
नयनीं किरणांचे जे भाले ॥ मृत्यूपरि तेही निर्दय झाले ॥
लागुनि जखमा गालहि न्हाले ॥ झाले लाल ॥
लज्जेचा प्रात काल ॥११॥
अघटित जादू केली बाई ॥ त्याचें त्योंसहि भान न राही ॥
बघता बघता होउनि जाई ॥ कांहिंच्या कांहीं ॥
मज माझें कळलें नाहीं ॥१२॥
ओठीं ओंठ लागल्या काळीं ॥ मिटल्या नयनीं रात पसरली ॥
फुलल्या वदनीं सकाळ आली ॥ पंगली फार ॥
गालावर ऐन दुपार ॥१३॥

## अनंताचे सूर

••••••••••••••••

गाण्याचा पाहुनि जल्सा ॥
मन रमलें नाहीं सहसा ॥
गोड सुरावट गायक ते ॥
गाता झुलती आयकते ॥
तालसुरा होती मिळणी ॥
गुणुनिया गेले कोणी ॥
परतु माझें मन न वळे
का माझ मजला न कळे ॥
सात सूर मिसळुनि नादीं ॥
तानाची झाली गरदी ॥
भिनल्या येई कुत ॥
नादाचे नाचे भूत ॥

जनसमर्दी पहावया ॥
गर्ला मनिं मज विसराया ॥

मित्र देश, माया मित्र ॥
कृत्रिमेंच सृष्टि स्थिर ॥
कटाळा आला परता ॥
तेथुनही झालें सरता ॥

## स्वागत

••••••••••••••••

शुभमंगल दिन साचा ॥ बहु भाग्याचा ॥
निरखुनि सानुज श्रीयुवराजा ॥
वृत्ति मनाच्या हर्षोद्भव ज्या ॥
उघडुनि त्या नव वाङ्मय लाजा ॥
एक नाद भरती गगनीं ॥ जय शब्दाचा ॥ १ ॥
स्पर्शहि विघ्नाचा नच झाला ॥
क्षेम निरामय आपण आलो ॥
केल्या वश नव विद्या सकला ॥
भाग्यसूर्य ये उदयाला ॥ प्रजाजनाचा ॥ २ ॥
अभिवादन करित निसर्ग ॥ सुंदर योगा ॥
प्रभा रवीची करि अर्धांगी ॥
ज्योत्स्ना ठेवी विधुच्या संगीं ॥
जो वसुधेसी योजी ॥ अंबर भागा ॥ ३ ॥
विद्या वैभव लाभे उभयां ॥
प्रजार्थ त्याचा सद्व्यय व्हाया ॥
कुलकीर्तीनें अलंकाराया ॥
प्रभुप्रसादें लाभ घडो ॥ या दासांचा ॥ ४ ॥

## प्रणति



प्रणति लीन तव पदासि नृपाल !
निज परिजन ज्यास करित ॥
जयां स्वकीय म्हणविसि ज्या सुखप्रदा सदाहि ॥
(साभिमान जयांसि म्हणविसि सुखप्रदा सदाहि ॥)
आश्रयार्थ धांवुनि जरि सकलहि ॥
ललितकला दासी ॥ येतांच तव पदासी ॥
सुखद सदनिं बसवुनि हंसविसि नटविसि नव गुणांहि ॥
ही विशाल भव्य नयनसुभगा ॥
नाट्यरंगशाला ॥ गाईल तव यशाला ॥
करकरिल तव गुणगण-रती हृदय, उदारताहि ॥

## स्वस्ति तुम्हातें, मित्रा



स्वस्ति तुम्हातें, मित्रा,—वदत सहजि अशी वाचा ।
द्या मज हा अधिकार तुम्हांला 'मित्र' म्हणायाचा ॥ १ ॥
मित्रकृपेनें मित्रलाभ हा झाला मज तुमचा ।
किती वाटला तुमचा परिचय एकचि दिवसाचा ॥ २ ॥
थोर मनाशीं क्षणमात्राचा परिचय वर्षांचा ।
क्षणसहवासें ऋणानुबंधहि जमतो कायमचा ॥ ३ ॥
अल्पकाल जल वर्षुनि समयीं मेघ धन्य होती ।
..................भूमागावरती ॥ ४ ॥

## धिग् तव जीवन



धिग् तव जीवन, धिग् बुद्धीतें; धिग् त्या रूपाला ।
दुर्गुणसंघा आश्रय दे त्या धिग् सौंदर्याला ॥
तुजसि कराया मत्कवनाचा विषय मजसि वाटे ।
स्मरतां तव कृति मत्तप्र नद सर्वथैव आटे ॥
क्षीण होतसे गतवृत्ताच्या स्मृतिनें ओशाळा ।
क्षुद्र वस्तु! तव नीचपणाचा पडता पडताळा ॥
श्रीमान् रविच्या किरणीं शोभे भिकारडा काच ।
त्या भगवाना गमे तिच्या तो तेजाचा नाच ॥

## नौका



वाहत जें जें पात्र सारखें एक अनंताचें ॥
काळ कवन हें दो रंगाचें दोन ओघ त्याचे ॥
त्रिकाळ यमुना कृष्ण जळाची धवल कवनगंगा ॥
उधळित जाती एकसारख्या हृत्तरंगगंगा ॥
ब्रह्मतटावर नौका एकचि ही धडकायाची ॥
चिरंतनावर ध्वजा एवढी ही फडकायाची ॥

## अंतरिं खेद भरे



अंतरिं खेद भरे! दीन वदन बोलेना ॥
शून्य आलोक, शून्य जग, शून्य हृदय डोले ना ॥
शुभ दर्शन चरणाचें नच आता म्हणुनी ॥
देह हा जड जाहला। शोकविकल हाले ना ॥

व्यर्थ जीवित यावरी वज्र पडेना कां शिरीं ॥
हें अपयश आजि या। प्राक्तनिं इत आलें ना॥

## निर्दय देवीस!

••••••••••••••••

हृदयशारदे! निर्दय देवी! ठेव मनीं खोल॥
प्रेमशरांनीं मरणाराचे शेवटचे बोल॥ धृ.॥
नव कवनाची अफू खाउनी गुंगच होतों मी॥
वेसावध धाकिलास वेड्या प्रेमाच्या होमीं॥
मारिलेस जैं निज नयनांच्या किरणांचे भाले॥
गुंग मनाला चैतन्याचें सौख्य तदा झालें॥
दाहक नव्हतें परि मज जेव्हां भेदित ती गेलीं॥
टोंकें त्यांचीं प्रेमविषांनीं होतीं भिजलेलीं॥
झरत चालले हृदय सारखें प्रेमविषें न्हालें॥
नैराश्याचा धक्का बसुनी गमे ठार झालें॥
नयनशरांनीं मम हृदयाच्या वज्र चिंध्या केल्या॥
फुटलें तुटलें सांधितें त्या आशाही मेल्या॥
चिरविरहाच्या तापानें त्या विलयातें नेल्या॥
रंगच्छायाही चिंध्यांच्या पार उडुनि गेल्या॥
मेलेल्या आशांची फांसुनि राखचि निर्जीव॥
पासरतो हृदयाच्या चिंध्या हा वेडा जीव॥
धडधडतो पाटेल मना तें प्रेमविषें भकला॥
ज्या त्या वस्तूमध्ये दिससी वेड्या डोळ्याला॥
निर्दय देवी हाय! किति हा केला अविचार॥
हृदयमंदिर मोडुनि केलें प्रेमाला ठार॥
नयनशरांनीं करितां तुकडे माझ्या प्रेमाचे॥
अश्रुरूप नयनांतुनि वाहे रक्त पहा त्याचें॥
प्रेमविषानें रक्त करपता निश्वासासरशीं॥
पगपगीत ही वाफ पसरते मिळते वाऱ्याशीं॥
त्या वाऱ्यानें भोंवतालचें जग हें होरपळे॥

सजीव होतें काल मग तें कुठें आज सगळें ॥
हें रात्रिचें चित्र जगींच्या तसें पहा त्याचें ॥
वसुधम्बुज प्याया भ्रमरा राग करीं नाचे ॥
निर्दय देवी हसता हसता केलें हें काय ॥
आग लागली जगास माझ्या विश्व ल्या जाय ॥
कोमल गाला सौन्दर्याची प्रेमाचा राग
आणुनि हृदयीं झेलुनि घे मी तुझे नयनभाग ॥
प्रेमयाचना करिता देवी हातहि हातात ॥
गमलें नव्हतें कीं तू करिशिल असा पुढ घात ॥
प्रेमाधानें विश्वासानें धरुनि करीं हात ॥
टाकिलेंस त्या नैराश्याच्या भयाण डोहात ॥
त्या हृदयाची माती माती यापरि करीस ॥
कल्पनेंत मम शिरुन आता पाहत बसलीस ॥
का हससी निर्दये दावुनी प्रीति अशी फसवी ॥
तव शरिं मरणाराची तळमळ काय तुला हसवी ॥
करकमलाचीं दलें दळाशीं लाविताच अंग ॥
सवत्याच्या भेटीचा तो गमे पूर्वरंग ॥
प्रेमाधाचा परि विश्वास धरुनि असा हात ॥
टाकिलेंस त्या नैराश्याच्या भयाण डोहात ॥
प्रेमयाचना परिसुनि हसलिस गालांच्या गाली ॥
हृदयाच्या रंगाची आली गालावर लाली ॥
भावि भाग्यसूर्याची माझ्या उगाच ती गमली ॥
हाय ! निराशा रात्रीची या परि संध्या ठरली ॥
भविष्यकाळामधून माझ्या दिवस पळालाच ॥
काळ्या रात्रीं काळोखाचा अखंड हा नाच ॥
आग लागता हृदया निघती नि श्वास ज्वाला ॥
तापुनि लाग काळोखाचा रस उकळायाला ॥
जळत्या जगांतलीं प्रेमाचीं भूतें हीं सारीं ॥
रसरसलेल्या काळोखामधिं माजतात भारी ॥
ऐक तयाच्या अखेरच्या या भयाण किंकाळ्या ॥
बहिरें होतें अगदिच सारें बसति कानठळ्या ॥
मनहि माझें त्या हृदयाच्या स्मशानांत जळतां ॥
हें स्मरणाचें भूत नाचतें त्या आगीं आतां ॥

झाला माझ्या भोंवतालच्या विश्वाचा जाळ ॥
त्या राखेवर नाचाया मी झालों वेताळ ॥
ही हृदयाची आग भडकली जरा विझायाला ॥
अश्रुजलाचा समुद्र गिळिला तरी न तो पुरला ॥
जिथें जिथें ही पडते माझी सैतानी दृष्टि ॥
काहींच्या काहींच होतसे तिथें तिथ सृष्टि ॥
रम्य चंद्रिका करपुनि होतो तिचाहि काळोख ॥
आनंदाच्या या नजरेनें होत महा शोक ॥
जळती तारा, फुलें करपतीं, काय कथा याची ॥
निष्प्रेमानें राख जहाली श्रीजगदीशाची ॥
आग भडकता हृदयामधली ईश्वरही मेला ॥
निर्दय देवी खेळ एवढा पहा तूच केला ॥
ही हृदयाची आग भडकती जरा विझायाला ॥
अश्रुजलाचा समुद्र गिळिला तरी न तो पुरला ॥
तुझा पूर्ण मुखचंद्र पाहुनी हृदयसागराला ॥
पूर्णानंदे भरती आली पूर्ण पौर्णिमेला ॥
परि तो निर्दय चंद्र न आता करित रम्य हास्या ॥
नैराश्याच्या काळोखाची आज अमावास्या ॥
खळखळुनी हें आलें दुप्पट उधाण दरियाला ॥
चिरविरहाचा वडवानलही आज उचंबळला ॥
काळोखाचा अफाट दरिया आकाशीं वरती ॥
काळ्या पाण्याचा हा दरिया हृदयाच्या भंवतीं ॥
इकडे दरिया इकडे दरिया कोण मूळ काया ॥
कोण कुणाची छाया, खेळे लपंडाव माया ॥
विरहाग्नीनें हीं पाण्याचीं विश्वें सळसळतीं ॥
दोहीं दरियामधल्या लाटा धडाधडा जळती ॥
एकमेकिवर आदळताना किंवा जळताना ॥
त्या लाटातुनि भीषणतेच्या निघती या ताना ॥
झंझावातावरतीं त्याचा नाट असा नाचे ॥
सुरामागुनी सूर उसळती माझ्या कवनाचे ॥
असलीं कवनें गाता गाता निराशाभकारीं ॥
अर्धा मेला येउन पडलों मरणाच्या दारीं ॥
तुझा विषारी घाव यापरी अपुरांच राही ॥

सुख तर नाहीं—नसो परी हा जीवहि नच जाई ॥
टाक विषारी नजर जराशी पुन्हा एकदाच ॥
पुन्हा एकदा—पुन्हा विषारी बाणाचा नाच ॥
काळमुखीं दे लोटुनि झालें बहु कासावीस ॥
हीच विनवणी तुझ्यासारख्या निर्दय देवीस ॥

तुफान दरिया असा तयाच्या हल्लकल्लोळात ॥
मरणकाळचीं गाणीं असलीं चवलें मी गात ॥
ये का लाविसि उशिर एकदा करि पुरता ठार ॥
निज भक्ताच्या हत्येची तर हौस तुला फार ॥

## इंद्रजिताचें पत्र

•••••••••••••••

शेषकन्यका सुलोचना ती सून रावणाची ॥
इंद्रजिताची भार्या देवी साऱ्या जगताची ॥
निजुवलेला पतिव्रतचे वीर रण गले ॥
देह ठेविला घरीं सतीचा मन सगें नेल ॥
दैत्य वानरीं निजुवलेला रणकन्दन केलें ॥
तसें सतीच्या मनिं तर्कांचें तुंबळ रण चाले ॥
दार वाजलें—आली का ग रणातुनी स्वारी ॥
सखीजनाला पुरे पुरेसें करी सती भारी

## हा हाय !

•••••••••••••••

सोडुनि गेला प्रिय जनका का प्रियतम बालेला ॥
भलत्या काळीं मुहूर्तनिश्चय का असला केला ॥
किति हौसेनें विवाहकौतुक केलें हो माय ॥
—आणि—पुढें परि चिंतनींहि हें वडें मन लागे ॥

शुभ लग्नाचें शुभतर फल नच पाहिलेंत ताता ॥
कोणि करावें नव्या जिवाचें नव कौतुक आतां ॥
करील त्याचे लाड चहुपरी माता—हा हाय ॥
मूर्ति परी ती दिसतां आतां हृदयिं नको घाय ॥
शुभसर्वस्वा मंगल धामीं सौभाग्याच्या जी ॥
—काय वदावें, कसें वदावें—केविं दिसत आजी ॥

## अंतकाळची याचना

••••••••••••••••

[चाल–आम्रमंजरी तुला]

प्रार्थितसें एवढें गडे ग पाहि जरा मजकडे गडे ग ॥
मृत्युलोकिंची वसती सरली
जीवन आशा वाटे गेली । मर्यादेपलीकडे गडे ग ॥
इहलोका जरि होत पारखा
तरि भेटीस्तव तुझ्या, सारखा । जीव पहा धडपडे गडे ग ॥

## हाय हाय !*



वाहे वारा कसा भरारा, वातचक्र फिरतें ॥
जुन्या नव्या पानाचें सारें विश्व त्यात फिरतें ॥
कण धूळीचे उडुनी जाती त्या वाऱ्यासंगें ॥
हाय हाय, परि ठायिंच ठरती माझीं जड अंगें ॥
या पृथ्वीचें आकर्षण हें मला तोडवेना ॥
पायाखालीं जरि तुडवितां तरी सोडवेना ॥
वरतीं वरतीं पळती लपती लखलखत्या तारा ॥
वायुसागराच्या फेनाचे थेंबचि शतधारा ॥
विमानगतिनें कुणि वरतुनि रसगंगा ओती ॥
नभोनिधीच्या उदरीं उडवी हे पळते मोती ॥
दिसतीं मजला हवीं वाळली पुष्पें कालचीं ॥
परी नयन इथुनीच टाकिती किरणें आशाचीं ॥
नको मला तें, दिसे न त्या जें तसच नाहीं जें ॥
तें आणाया, तेंच बघाया जीव न हा लागे ॥
वरती दरिया, खालीं दरिया, असेंच झालें ना ॥
मी पोहाया बघतों तरि हें अंगच हालेना ॥
मनात माझ्या कुणी गातसे नवलाचे सूर ॥
मलाच ऐकू येति न, नुसती लागे हुरहूर ॥
माझें गाणें तें ऐकुनि मी व्हाया बेभान ॥
एकसारखा करितों माझ्या जीवाचा कान ॥
अंतर्यामीं आग भडकवा जळून जाऊ दे ॥
त्या ज्वालामधिं माझी ज्वाला मिळून राहू दे ॥
हाय हाय तें ऐकू येत न झालों हैराण ॥
तीव्र सुराचा मलाच लागे मनातला बाण ॥
इथें राहुनी मला नजर ही चहूकडे फिरते ॥
दिसतें तितकें मला मिळेना नको तच मिळतें ॥

---

* 'वाग्वैजयन्ती' त असलेली याच शीर्षकाची कविता बरीच त्रुटित असून तिच्या रचनेंतहि बरेच फेरफार आहेत

आग लागते कुठं तेथुनी धावतात ज्वाळा ॥
वाऱ्यावरती पळता पळत भेटतात काळा ॥
किती भावना, किती श्वासही त्यासह जातात ॥
हाय हाय का मलाच त्या मग इथें टाकतात ॥
येतें काहीं जात काहीं मी नुसता बघता ॥
कोणी येता जातां मोठ्या आशेनें उठतां ॥
उडल्या पत्ताच्या जीवाला लागताच वारा ॥
तिथल्या तिथेंच हाल्चालिंचा खेळ होत सारा ॥
निश्वासाच जीवन सार, आशेची दृष्टि ॥
हाय हाय ही येत कपाळीं मनातली सृष्टि ॥
मला नकोसा मी तों असतों नित्य मला मीच ॥
क्षणोक्षणीं उचावत नभ कीं भूमि होते नीच ॥
मेघपृष्ठीवर शुद्ध चंद्रिका नवतेजा पाडी ॥
इथेंच राहुनि जीव बिचारा मना तिथें धाडी ॥
त्या तेजस्वी ओसाडीवर खेळे नों आशा ॥
पायाखाली कठिण भूमि तो बाधित निज पाशा ॥
हाय हाय त्या मेघामधली एखादी बिजली ॥
बाणी होते न त्याची सारी सृष्टिच का निजली ॥
कडकडुनी पडताच तनूवर सुटेल हा जीव ॥
हाय हाय परि कुणालाच कशि येईना कींव ॥
देवा देवा खेळ असा हा मांडिलात काय ॥
मनातला हा कैदी करितो सदा हाय हाय ॥
लाख तारका नभीं सहज या ठेविल्यास देवा ॥
दोनच कुरंग्या नयनिं कांडिल्या, त्याहि तिथं ठेवा ॥
या इवल्याशा वाऱ्यावर हें जग गिरक्या खात ॥
मला न उडवी कसा मनींचा हा झंझावात ॥
पळयासह कधि पळत मन कधि उडयासह उडतें ।
कधि आकाशामाग दडत सागरिं कधि बुडत ॥
कोण तयाला तिथून माग ओढुनि आणीत ॥
पुन्हा कोंडितें या देहाच्या असल्या घाणींत ॥
कीं वाऱ्याच्या दोरासंगें वरतीं उडवाया ॥
जीव मनाचा पतग उडवी फिरुनी ओढाया ॥

तोड तोड त्या दोऱ्या देवा, मन तरि जाऊ दे ॥
जीव मरू दे, देह जळू दे, काहीं होऊ दे ॥
एका अशाची तरि आशा पूर्ण करायास ॥
उरल्या सुरल्या माझा देवा करिं सत्यानाश ॥
हिरता फिरता पुरा ल्हरिचा स्वैर विश्वगामी ॥
जाग्या स्वप्नामधला माझा दाखवि मजला मी ॥
सारें विश्व हें टाक जाळुनी स्वप्नसृष्टि देइ ॥
मिटल्या डोळ्या दिसे तत्त्व दे दिसणारें घेई ॥
शरीर माझ जग हें माझ कसा जीव घेतें ॥
जियें तिथ हें माझ मजला कस आड येतें ॥
वस्तुवस्तुचा नाद निपजुनी वाऱ्यावर पळतो ॥
पळतां पळता दूर दूर मग कुणीकडे जातो ॥
अट्टाहास ओरडता मज विरून जाऊ दे ॥
नादरूप मज त्या नादासह झरून वाहू दे ॥
रवितापानें जलबिंदूची विरल हवा होते ॥
कुणीकडे ती पळते याचा विचार मन करितें ॥
संतापानें या देहाचे अश्रुच होऊ दे ॥
अश्रुजलाच्या हवेंत मजला फिरून घेऊ दे ॥
बनतो वारा, बनतो तारा, हें सारें काहीं ॥
माझ्या देहाचें कांहीं कस होत नाहीं ॥
कराच मजला हा कवीची कल्पनाच अथवा ॥
त्याच्या प्रतिभेवरतीं मजला दे टाकुनि देवा ॥
दुर्दैवाचें सुदैव करिं जें पळे सदा दूर ॥
निराश मनिंचें स्वप्न मला वा माझिच हुरहूर ॥
भाव कुणाचा करिं मज अथवा कोणाची आशा ॥
उच्चउच्च जी जाइल तोडुनि बडाच्या पाशा ॥
कुणा मुलाच्या मनातली मज करिं वा जिज्ञासा ॥
ज्या त्या वस्तूवर खेळू दे मायामय भाषा ॥
ज्या रमणीचा नाथ न कळता चिर नष्टचि झाला ॥
तिच्या मनाची प्रमाणा तरि करिं देवा मजला ॥
अशक्य असतें, अतर्क्य असतें, अनंत जें असतें ॥
त्याच्या त्याच्या पलीकडे ही ती आशा जाते ॥

त्या आशेच्या रूपानें तरि फिरून घेईन ॥
अमर्याद विश्वाला बळसा घालुनि येईन ॥
काय दया तुज नाहीं किंवा असशि फार दूर ॥
शक्ति धाडिशी तिचा होतसे म्हणुनी कीं चूर ॥
शक्ति मला जी धाडिशि दुरुनी ती विरुनी जाते ॥
माझ्याजवळी येतां येतां इच्छामय होते ॥
ती इच्छा मग मनीं सारखी लावी हुरहूर ॥
त्या शक्तिचा जळत्या हृदयीं कीं होई धूर ॥

शक्तिहीनता दिली अशी; असल्या इच्छा कां ॥
अनोळखीला, उच्छृंखल मन मारित कां हांका ॥
बघुनि विजेच्या नग्ना वांकड्या अंधुक चंद्राला ॥
वाटे त्याची करून द्यावी होडी जीवाला ॥
बघून तीवर टाकुनि मागें भविष्यकाळाला ॥
दिगंतिं जें जें, अनंत जें जें, हुडकावें त्याला ॥
या वेड्याला हंसतात बघ हे सारे लोक ॥
हंसोत —परि मग कां उरतो ह्या वेड्या मनिं शोक ॥

## शेवटची कविता *

••••••••••••••••

[ शेवटची कविता ! माझी शेवटची कविता ! तिला प्रस्तावना काय लिहूं ! माझी उत्रांची अनाथ कविता देवी—देवी, तूंच काय लिहावयाचें तें लिही. ]

शांत शांत दशदिशा; शांतवा तुमचे दशभाग ॥
शांत जरा व्हा सुरासुरांनो सकळ महाभाग ॥
अवकाशांतिल वायुसागरा रपटा करि बंद ॥
पल्लवका ! तव फिरत्या झुळुकी ठेव जरा बंद ॥

---

* 'राजहंस' या संग्रहांत पूर्वी प्रसिद्ध झालेली ही कविता मीन माझ्या जवळच्या गडकऱ्यांच्या हस्तलिखितामधून दिलेली आहे.—संपादक

देवदूत हो! पाउल वाजवु नका; व्हाच शात ॥
भूतांनो क्षण बंद करा हा तुमचा आकान्त ॥
प्रकाशातल्या अणूरेणू हो बंद करा नाच ॥
काळोखाच्या रज कणांनो! करा सदन जाच ॥
नका सळसळू देऊ तरुंनो तुमच्या पानांना ॥
श्वासहि सोडु न द्या लतिकांनो कोमल कुसुमांना ॥
फुलत्या कलिकांनो ठेवा ग स्तब्ध हृदयपान ॥
अर्धीं उघडीं ताड तशींच ठेवा क्षणमान ॥
नक्षत्रांनो चमकेची ही नकोच चाहूल ॥
काळा, पळत्या क्षणाक्षणाचें थांबवि पाऊल ॥
हृदया! धडधड करिसी कां रे, तूच कसें फिरशी ॥
कोंड झाली तरि, जीवा, धडपड करी मुळीं न अशी ॥
महाभाग हो! या आज्ञेचा मानू नका राग ॥
आज्ञा नच ही, परी करपल्या आशेची आग ॥
स्वप्नामधल्या स्वप्नातहि मज येत काळझोंप ॥
म्हणुनी हृदयातुनी उपटितों नवलाचें रोप ॥
राग नका धरु हतभाग्याचा ऐकुनि आकांत ॥
शांत शांत परि जिकडे तिकडे व्हा सारे शांत ॥
वाहू द्या हा मम कवितेचा प्रवाह शेवटचा ॥
ऐकू द्या हा तिजला माझा निरोप शेवटचा ॥
ऐकिलेंस ना—देवि—काय हे—कसला हा पूर ॥
रडशी का, वद, तुझें हृदयही झालें का चूर ॥
होय, देवते, कविते करितों मीच तुझा घात ॥
हा मातेच्या पहा गळ्यावर बाळाचा हात ॥
सावध सावध देवि शारदे क्षणभर दे कान ॥
चराचरांनो निरोप ऐका, व्हाच सावधान ॥
गा विहगांनो, कविश्वरांनो, गगनगायकांनो ॥
हसा मुलांनो! हसा फुलांनो, हसा तारकांनो ॥
ऐकत नाहीं मी त्या तुमच्या मादक मुरलीला ॥
पाहत नाहीं सौंदर्याच्या मोहकतर लीला ॥
कुदलते करिं कुदकळ्यांनीं हसुनी उपहास ॥
गड्या गुलाबा झाडावरतिच हवा तसा हास ॥

मार भरारा गरुडा गगनीं, मी येतच नाहीं ॥
हे प्रतिभेचे पंख कापितों माझ्या हातांहीं ॥
चमक सारखी इकडून तिकडे तू चंचल विजली ॥
स्थिरावली कल्पना जागच्या जागीं ती थिजली ॥
फूलपाखरा तुझी तरळता फुलाफुलावरतीं ॥
नाचू दे, परि तरळ मना मी खिळिन जड जगतीं ॥
खुशाल आम्रा मज मन्नाचे पुष्पबाण मार ॥
ही सोनेरी ढाल रुप्याची हातीं तरवार ॥
आईच्या माडीवर पाहुनि मेलेलें मूल ॥
पडावयाची नाहीं आता मम चित्ता भूल ॥
नवयुवतींच्या नेत्रकिरणिं कुणि जरि केलीं जाळीं ॥
तोडिन तरि मी क्षणार्धांत तीं सारीं या काळीं ॥
राधारमणा श्रीकृष्णा तू बंद करी मुरली ॥
मनिंची मनात जिरवीन इच्छा जी उरली सुरली ॥
कलगीसाठीं कुणी धावत जरी तुरेवाला ॥
लागानाधा नुरता आता सलाम हा त्याला ॥
धनिक जनाच्या तनुवरि रत्न नुसतीं असतात ॥
कविच्या हृदयीं प्रभा पाडुनी परि तीं हसतात ॥
मज रिझवाया कालिदास वा येऊ द्या राग
नीरसतेचें चिल्खत वरि मज अभेद्य पाषाण ॥
ही अनवद्या देवी आता हीच अनंता ही ॥
चिरकालाची समकालिन ही स्वसा काय नाहीं ॥

## स्मरणार्थ टिपण

••••••••••••••••

### वेळोवेळी सुचलेले विचार, कल्पना वगैरे

चांगला बाग आहे, विहीर आहे नाव मोठें आहे, मग मुलगी द्यावयास कोणती हरकत आहे!

ज्ञानाचीं किरणें सुद्धा Refraction पावतात कवींचा कारखाना

कवी व वेडे गोल्डस्मिथ, केशवसुत Light is invisible

The sign of the glance angle bears a close relation to the sign of the heart s inclination—

एकदां expose झालेल्या प्लेटवर फोटोची आकृति वडीवाकडी उठते त्याप्रमाणें आमच्या आधुनिक कवित्व ह्यावर पौर्वात्य व पाश्चिमात्य अशा दोन्ही काव्यांचीं प्रतिबिंबें मिश्ररूपानें पडली आहेत कवींचा कारखाना

In the eye The pupil adapts itself in size according to the amount of light Yes but in व्यवहार the light adapts itself according to the pupil

निरंकुशा कवय अरसिकेषु कवित्वनिवेदन "रसिक" शब्दाची व्याख्या प्रासादिक काव्य—चढ सुड वगैरे (पा)खंड —कवींचा कारखाना काव्य मूल आहे आणि मुलात काव्य आहे

Magnetism & Heat give a good simile

Two brothers one in ahigher class and the elder one in the lower class queer wit of the other

I am not of your social grade I am sure you are good you are sure I am bad
आपल्याचें भ्रम दागविणारा विनोदी सीन

कजुष मनुष्याबद्दल विनोदी लेख.

बाजारगप्प या विषयावर विनोदी लेख—

माझ्या तोंडावर नाचणारे प्रश्न आधीच विचारून टाकून तू मला निष्काळजी मनाचा ठरवीत आहेस.

. .

घरच्या छपरावर एक मांजर उडत्या पाखरावर वर झडप घालू पाहत होतें; तें पूर्वजन्मीं मनुष्य असलें पाहिजे वगैरे.

. .

एडिटरइतकें एखाद्याविषयीं ज्ञान असणें

. . .

विद्यार्थ्यांनीं दिवे लावणें व युनिव्हर्सिटीनें दिवे लावणें

. . .

म्हातारा व त्याचा बैल या गोष्टींत बैल काहीं मरत नाहीं वगैरे—

. . .

रविकराच्या स्पर्शानें उषेची लाली लोपून तिचें तोंड फिकें पडतें तद्वत् माझ्या हाताचा स्पर्श होताच—

. . .

अशा मन स्थितींत घोंगावणाऱ्या वाऱ्याच्या वरळण्यात अर्थ सापडू लागतो; यदृच्छेनें भटकणाऱ्या व बदलणाऱ्या ढगांत कल्पनाचित्रें सापडतात. सामान्य वाङ्मयातल्या प्रेमविशिष्ट भागावर प्रेम जडू लागतें.

दग्धमनोप — शामल.

. .

एक एक शब्दसंघाच्या निरनिराळ्या पुनरुक्ति करीत बोलणारा मनुष्य—

एक एक शब्द तोडून बोलणारा (काय समजला !), (काय ?), (ध्यानात आलें काय !) वगैरे शब्द वापरणारी माणसें (शेवटीं हं म्हणणारी माणसें) (हं हं) शेवटीं म्हणणारी, जणू काय घट्टेनेंच बोलत आहे.

.

गोविंद काळे याचें नानास पत्र—

भययाचा पोर पगार द. म. ३०० रु.

चंद्री कलावतीण पगार द. म. २०००

उतारा—इतिहास संग्रह पु. ४ अं ७।८।९

शुद्धिपत्र याबद्दल कोटी.

. . .

वीररसप्रधान नाटकामुळें टाईप संपला

. . .

कवितेंतील शब्दरचना व खोरोचा खेळ वगैरे.

. . .

मद्रासी माणसाची फास्ट नाटकातल्या प्रतिहारीसारखी दिसते.,

. . .

सुंदर स्त्रियाशीं बुद्धिबळें खेळणें.

. . .

निरोप तुम्हा सुंदर स्त्रियाना सौंदर्याचा काय ?

. .

प्रत्येक वस्तु मानवी राज्याच्या इतिहासातील पान आहे.

. . .

त्या आशा आज कोठें आहेत ! प्रेम-
दवाखान्यातला आजार—एक प्रकरण.

. . .

रामराम. वीराशी गाठ पडल्यावर.

. . .

पानाडोळा केला = मनुष्य गार होणें; भाजून काढणें.

. . .

जीव गेला तरी मरावयाचा नाहीं अशी एक character घालणें—
स्पष्टीकरण करताना जास्त घोटाळा करणारी एक character—

. . .

बाल्य, तारुण्य व वार्धक्य यात बुद्धि व कर्तबगारी याची तुलना.
बालपणीं तारा, तारुण्यात फुलें व वृद्धपणीं माती—

. . .

फुलें वेंचणें तिथें गोंवऱ्या वेचणें वगैरे
त्याची दनुवटी कापल्यासारखी दिसत होती.

. . .

मोठ्याचें सगळेंच मोठें ..
श्रीमंताची लाज व श्रीमंताची जीभ—

. . .

एक तोंडाचीं दोन तोंडें  एक माझ्याशीं बोलण्यासाठीं व  एक लोकाशीं

तोंडास तोंड दिलें तर दाम दुपटीनें परत मिळतं, एक तोंडाचीं दोन होऊन

मार व शिव्या खाण्यास दुसऱ्याचीं तोंडें व हात लागतात

लग्नाच्या शृखला तोडण्याचा प्रयत्न केला तर खडखडाट मात्र जास्त होतो

एखाद्या ज्योतिष्यासारख्या खोटें बोलणें.

बर, तिची एखादी खूण सांगा  जिनें तुम्हाला खूण केली तीच—

त्याचं नाव काय ? कसलें नाव, तो नाव घालवून—

प्रेमाचे खेळ  खेळाचं प्रेम  तरुणपण व बालपण

पावसाळ्यात सृष्टिदेवी मूल मेलेल्या आईप्रमाणें राहून राहून रडते—

सृष्टीचें हृदय भरून अश्रुवृष्टि झाली म्हणजे पाषाणहृदय पर्वताच्या हृदयातून जलौघ वगैरे—

तापानें हिमालयाच्या गगायमुना

स्वताला अति पाणी झालें म्हणजे नद्याचे ओघ वाहविणारे पर्वत  अनेक आहेत पण तप्त स्थितींत हिमालय गगायमुना वाहवी

प्रतिवर्षी नवीन जन्म घेणारी वनस्पतिसृष्टि प्राण्याहून सुखी नाहीं काय—

हिमालय एरवी शोभादायक, पण उन्हाळ्यात जगत्कल्याणकर, श्रीराम सीताहरणानें सतापलेले असता जगाचें हित केलें

दुसऱ्याच्या गळ्यावर हात ठेवून व स्वताच्या छातीत हात लावून

प्रतिज्ञा करणें, तरुण स्त्री वगैरे—

. . .

एक पाजी जात—रामनाम व स्त्रियांचे हात : हस्तागत.

. . .

वारळ्याच्या घरट्यात किल्किल्णारे बालकोकिळ—नाटकांतील मुलें.

. . .

वायुलहरीवर येणारा मिश्र सुवास = मुग्धेची अस्पष्ट वाणी.

. . .

थोरांचें वैर : मोठ्या झाडाचें वैर. सहन् दर्शनीं भेटीप्रमाणें वाटते, वगव्यात पर्यवसान.

. . .

हृदयाच्या धडधडत्या भाषेत एकच शब्द आहे म्हणूनच आपले विचार प्रियजनाना कळत नाहीत. गडगडणाऱ्या मेघाची स्वर्गीय भाषाही एकच शब्दाची असल्यामुळें देवाचे संदेश आमच्या बहुभाष मनुष्यवस्तीला कळत नाहीत—

.

पचेल तें खावें, दिसेल तें पाहावें, मिळेल तें घ्यावें.

. . .

कळकाचें झाड वाढलें तरी—

. .

निपाणीस केशवसुताच्या कविता.
कानडी व मराठी भाषाचें निपाणींतील सख्य.

. .

बायका बोलत होत्या त्यामुळें वाळे वाजेनात.

. .

जुनी बाजाची पेटी = गटाराचा फुटपाथ.

. .

एक उत्तम प्रवेश—आरशातून मनुष्य काढून दाखविणें. Serious प्रवेश पाहिजे.

. . .

झोपेंत बडबडणारावर खरेपणाचा आरोप करणें म्हणजे स्वप्नातल्या संमतीबद्दल त्याला जागेपणीं जबाबदार धरणें...

. .

म्हापशात सध्याकाळीं सर्व लोकच साधारणत. इतक्या जड वाणीनें बोलतात कीं माधवराव रानड्याची आठवण होई : याचें कारण दारू.

•

बिघडलेल्या दुधापेक्षा चागलें ताकच बरें.

• •

त्यानें हें बोलताना चेहरा इतका निर्मळ ठेवण्याचा यशस्वी यत्न केला कीं चित्रगुप्तानें सुद्धा त्या गोष्टीची जमा न जागता घडलेल्या पातकात केली असेल.

•

त्याला ब्रह्मदेवानें डोळे दिले होते ते उपयोगाकरिता दिले नसून निवळ मनुष्यदेहाच्या रचनेची परपरा चालू ठेवण्याकरिताच दिले

खानावळींतील तूप धन्याची खरी सेवा करतें. कारण तें फारसा भात खपू देत नाहीं.

•

खानावळवाल्याचा उद्दामपणा पोटात घालणें, त्याचें अन्न पोटात घालण्यापेक्षाही अधिक सहनशीलतेचें

• •

बायकोसमोर पुरुष काळवेळ विसरतात की
विनोद

•

दारू व भांग यांतील भेद—दारू = जीवनावर उदार. भांग = स्वत विषयीं चिंता. दारूच्या वाङ्मयातील रस शृंगार (विकाराचें स्वरूप, शपथा वगैरे घेणें), वीर (रौद्र व भयानक मिश्रित), करुण (पश्चात्तापयुक्त), भांग = हास्य, शांत व अद्भुत दोहाचा शेवट शांत रसात होतो. दारू दुसऱ्याविषयीं बोलती असते, भांग आध्यात्मिक विचाराला अनुकूल असते, थोडक्यात भांग आर्यसंस्कृतिपर व दारू पाश्चात्य विचाराच्या वळणाची—

त्याचे केस पाढरे होते गगनात उंच भराऱ्या मारणारे डोके शुभ्र असल्यास नवल नाहीं. उदाहरणार्थ, हिमालय, टगण्या पर्वताच्या माथ्यावरचा हिमकण

सापानें खाल्लेल्या चांगल्या पदार्थांचें जसें उत्तम प्रकारचें विष होतें तसें काळोखानें गिळलेल्या पदार्थांचीं रूपें विशेषच काळ्या ढगाप्रमाणें दिसतात

• •

तारका, चंद्र आपणाकडेच पाहत आहे व असें आपणाला वाटतें याचें कारणही हेंच

समुद्रावर आंतल्या गाठीचा मनुष्य सुद्धा पोटांत असेल नसेल तें ओकतो—

पोकळीत गिनी व पीस यांची योग्यता एकच ठरते पोकळ डोक्यांत उत्तम व कवडीची किंमत—

दारूमुळें मोठमोठीं वैरें सुद्धा विसरलीं जातात अग्नि व पाणी—

(How to create new characters)

प्रेम वाचाळपणानें व्यक्त नाहीं डोळ्यांत दिसतें गालावरून बोलतें

आमची प्रतिमा हुतुतूच्या गड्याप्रमाणें आकाशांत चांदण्यांना शिवून चटकन् परतते

दुसऱ्याचीं assertions confirm करण्यासाठीं शेवटचा शब्द repeat करणारें पात्र.

•

अस्वलाच्या गुदगुल्यांना हसू येत नाहीं

इंग्रज स्त्रीला कुंकू नाहीं म्हणून तिला विधवा म्हणण्याइतकें मूर्खपणाचें होईल

कधीं काळीं उघडणारा दरवाजा उघडतांना कुरकुर करावयाचाच

राम कनक व कांता स्वर्णमयी सीता

मारवाडी कनक व काता दोन्ही झाकून ठेवितात.

. . .

एका महाकवीचे अलंकार=श्रीमताच्या गौरीची आरास साऱ्या आळींत दृष्टीस पडते.

. . .

बागडी पेच=भीष्माला कृष्णानें जिंकले. धर्माला पेच—

. . .

पतीचा आधार सोडताच स्त्रिया पतित दशेला पोचतात. वेली वृक्षाला सोडताच मातींत मिळतात. विजेची अधोगति तिला पाताळात नेऊन सोडते.

. . .

जानव्याच्या गाठीमुळें ब्रह्मस्वरूप झाल्याप्रमाणें, दोर गाठीमुळें विहिरीचा नमून चढावयाचा आहे. अगडबंब मूर्तींसाठी सुतपुतळी वगैरे.

. . .

पुढें आलेले दात पुढें पुढें करणाऱ्या माणसाप्रमाणें दुसऱ्याच्या दाताना; आपुल्यासारखे करिती.

. . .

'सांगावयास नकोच' असें म्हणून सांगितलेल्या गोष्टी. लेखकाचे वळसे.

. . .

वेताळ पेठेला इतिहास.

. . .

आशा धैर्याची जननी आहे.

. . .

शामल—त्यानी अंत पट दूर केला पण अदृष्टानें तो आम्हा दोघामध्यें कायमचा आड केला. वगैरे—'तोड ही माळ'

. . .

कठोपनिषद् वगैरे सोडलें तरी नाव देणें

. . .

अश्रूंची पुष्करणी

. .

हे सुंदर चित्र, एकाद्या डोळा तरी सुंदर एक निखळल्याचा अश्रू दावील. माझा हात=देवाचा निर्दय हात. हे मरिष्य पाटी चाईद नाहीं.

. . .

सुंदर कन्यकाना माताच्या आशा अपौरुष, वेदाक्षप्रमाणें—

वाङ्मयाच्या कोणत्याही प्रांतावर आकाशाचें व्यापक छत असतेंच

वल्लभेच्या सगोत्र आत्ताहीं आपलें जें मायाळूपणाचें वतन असत तसं जगाशीं असेल तर काय बहार होईल

चंद्र व कमळें यांच्या स्त्रीमुखाला उपमा देण्याचें कारण—

उगाच शिंगें न देण्याचें कारण

मुलानीं दोन दोन तारखा फाडणें

नवें अन्न जिरत नाहीं—टीकाकार

माठ्यात खडे टाकून पाणी पिणाऱ्या कावळ्याची गोष्ट खोटी आहे

वघाचे डोळे, रडणें वियोगानें

देव मूर्ति व स्त्री मूर्ति—'तोड ही माळ'

हिऱ्यानीं तृप्त न होता चंद्रकांत, रस व तेज, कारंजाच्या धारांतून अग्निधारा–
उनपावसात इंद्रधनुष्य, प्रेम
प्रेम व वैराग्य अगदी जवळ

शांत जलाशयात एक लहानसा अचेतन दगड पडला तरी सारख्या वर्तुळ लहरी दूरवर पसरत जातात, तद्वत् मनुष्यमनात एकादें Observation वाक्य, शब्द पोंचताच तो move होतो फार शब्द वगैरेची काहीं जरुर नसते

• •

मनुष्य हा पृथ्वीचा पुत्र तसाच स्वर्गाचाही आहे Expand

शकुन वाघसिंह, वीराची सेना, अनाथ विधवा–तोफा, शिंक, Think more—प्रेमविकास—

विधिलेखात फेरफार; इतकी Forgery

. . .

आयुष्याची दिशा, दाहि दिशा मोकळ्या, दिशाभूल होणें शक्य नाहीं.

. .

घरात चाललेलें गावींहि नसतें. दोन हाताचे चार हात करणें; दोन हात दूर असलेले.

. . .

लग्नाची घटका, सुखाची घटका.

. . .

माझे प्राण घेशील तर मरेपर्यंत उपकार विसरणार नाहीं

. .

अमल, नजर फिरली, नवऱ्याचा अमल

. .

तोंड दिसलं तर ताड पाडणार नाहीं.

. .

आमचे कवि लेखक अन्योक्ति करण्यात फारच पटाईत.

. . .

शास्त्रीय शोध घ्या—
निरक्षरतेचा जोर कमीच होणार

. .

देव अमृतपानासाठीं स्त्रियांच्या ओठांवर वगैरे

.

कद्रूपणामुळें सोनें शिजू नये कसोटीवर न लावता खोटें सोनं घेऊन—

. .

Prosaic unromantic character व अगदीं मढवलेलीं chara-cter —'लोढ ही माळ'

.

शोकरसाचीं काव्यें म्हणजे शोकाच्या देवी काढणें

.

हिरकणी, वाघीण, नागीण, प्रेमपिशाच-

. . .

आराम व इंदु यांचें चरित्र—फर्ग्युसन मॅगझिन

ज्वालामुखीच्या नवऱ्यानें शेवटीं पराक्रमानें तिच्यावर छाप बसविणें पण मागच्याग—

. . .

त्यानें तिच्या कोवळ्या मनावर चांगले रसरशीत मारवाडी निखारे उधळले.

. . .

रिकामवेळीं भरलेलें पोट स्वर्गांतून थेट नरकाच्या तळावर जाऊन आद ळल्यावाचून राहणार नाहीं.

. .

वडिलांनीं निवडलेला नवरा.
तुझा बाप गाढव.

. . .

देव दगडाचे केलेले आहेत म्हणूनच माणसाची त्यावरील भक्ति पार दिवस टिकते.

. . .

नाटकांत हास्यरसाचे प्रवेश असतात म्हणून बरें.

. . .

पुस्तकांची पानें चाळलीं. फळ नाहीं.

. . .

या मारामारींत त्याचा हात होता, माझेंही अंग होतेंच.

. . .

कुत्र्याचें भोंकणें. मजुरीचे कामावर आली नसून घरच्या कामासाठीं, दिवसा नाटकवाल्यासारखीं निजतात. हें साम्य पल्लेदार भोंकण्याने विशेष पटतें—

. . .

विडा खायचा नाहीं असा विडा उचलला.

. .

हल्लींच्या लेखनसाधनापेक्षा पूर्वीची आपदा ताडपत्री.

. . .

Imp अतिशय शांत अशी Character Humorous side and serious side एकूण २, for humour चाबू of गंधर्व मंडळी मॉडेल.

. . .

गरीब प्रणयी व नीच वैभवशाली प्रणयी याचा बेत आयत्यावेळीं बदलणें —प्रवेश, दग्धमनीष

. . .

वेड लागण्याचा बहाणा करणें—

विनोदी लेसन वेड लागल्याची खात्री करून देण्यासाठीं कादंबरींतील वसतऋतूचें विसंगत वर्णन म्हणजे—

. . .

बायकापोरींवर impression बसविण्याचे मार्ग: बेफिकीरपणा, एक मेकावर कोम्या करणें वगैरे—

. . .

प्रवेश—भलताच निरोप सांगणें व तो ऐकणाराला ठाऊक असणें (सांगणारानें नोकरीच्या किंवा love च्या—)

. . .

मुतकातला सण.

. .

भुताचे पाय उल्टे. माणसाचें डोकें.

.

जीव नसेल त्यानें जीव द्यावा.

.

टेकृण मारण्याची युक्ति.

आता पहिल्यासारखें उत्तर देऊ नकोस

प्रसंग—एक पात्र दुसऱ्या पात्राला स्वताचा नोकर म्हणून ठेवतें. नोकर पुढें नायक होणें, दोघात प्रश्नोत्तरें—अमुक कोठ आहे ?

उत्तर—मेला. अमुक कोठ आहे ? मेला. मग तो नायक तरी कुठ ! उत्तर—हा पहा गंभीर स्वरांत थोडक्यात उत्तर.

स्वर्गाच्या पायऱ्या चढण्याचा कंटाळा करणें

. .

धार्मीकरहून शिकणें

अमृताच्या कुंडात बुडून मरणें.

दर्यांचें सामान एकदम आणणें.

. . .

आधळा या नात्यानें व डोळस या नात्यानें प्रेम करणारी व्यक्ति. मदनाच्या सैन्यात Who comes there सुद्धा विचारीत नाहींत.

. .

Plot वैभवाच्या लोभानें गरीब प्रणयिनीला सोडून थोर कुळातल्या कन्येशीं विवाह करणारा तरुण. पुढें Tragedy—

. . .

पायात बूट घालताच माथें फिरणें—
पायात बूट घालण्याचें माथ्यात वेड—

. .

हिंदुस्थानातील तरुण सामाजिक सुधारकाला हल्लीं दोन जबाबदारीचीं कामें शिक्षणदृष्ट्या सामाळावयाचीं आहेत; एक आपल्या मुलाला चांगलें शिक्षण देणें व दुसरें आपल्या वडिलाना शिक्षण देणें. या शिकवणीचे वेळीं जर विद्यार्थ्याला (बापाला) आपल्या गुरुचे (मुलाचे) सामाजिक सिद्धांत नीट पटले नाहींत तर त्याच्या मानसिक दारिद्र्याबद्दल गुरुलाच मार खावा लागेल. हा मार सोसून विमेपणानें ही दुहेरी शिक्षणाची जबाबदारी प्रत्येक सामाजिक सुधारकानें समाळावयाची आहे. सामाजिक विराट पुरुषाला हालवून जागं करावयाचें कीं त्याचा मारून, हा तरुण पिढीपुढें मोठा प्रश्न आहे

ता. २३–७–१४

ट्रान्सफर सीन : देव एक ऋतु बदलून दुसरा आणिताना दगाविजाच्या गडगडाटानें ट्रान्सफर घडवून आणितो.

ता २३–७–१४

. . .

स्मृति : कधीं लव्हाळ्यानें नदीच्या चचल पाणभुईवर स्वैर रेघोट्या काढीत होतो त्या रेघाचें क्षणमात्र जीवित; परतु त्याची स्मृति मात्र जखमा प्रमाणें किंवा दुर्दैवाच्या रेघाप्रमाणें अक्षय रूपानें अजून हृदयावर वठल्या आहेत. इतारा, निराश सस्मृतींत सुखाच्या स्मृति चिरजीव रूपानें राहतात.

. .

पूर्वजाच्या स्तुतीपेक्षा समकालीनांची निंदा मनाला गोड वाटते.

. .

जीवित क्षणिक आहे क्षण शब्दावरील कल्पना.

सत्य, सौंदर्य आणि बुद्धि याचा त्रिवेणी सगम हे आयुष्याचें स्वर्गसुख होय

स्त्रियाना शिक्षण दिल्यानें त्या बिघडतील असे म्हणणारानीं शिक्षणामुळें पुरुष बिघडतात म्हणून त्यानाही शिकविणें बंद का करू नये ? स्त्रियाना नोकऱ्या करावयाच्या नसतात पुरुषानीं तरी नोकरीकरिताच का शिकावयाचें ?

•

एका माईच्या कपाळावर कुंकू लावताच नायब होत असे (स.)

• •

ज्ञानाचे किरणसुद्धा परावर्तन पावतात Magnetism & heat यावरून उपमा

• •

कुलीन व गभीरवृत्ति आणि वृद्धवयाचा काळपुरुष प्रणयी जनाच्या सुखमय एकान्ताचे वेळीं लज्जाशील वृत्तीनें वेगानें पावलें टाकून निघून जातो, तोच दु खी जनाचें समाधानपर सात्वन करण्यासाठीं तिष्ठत राहून सोबत करितो.

काळ्याकुट्ट अधारात आपपरभेद उरत नाहीं त्याप्रमाणें काळ्याकुट्ट अत करणात राहणारा जीव शत्रु मित्रात भेद करीत नाहीं

•

वाऱ्याला सुद्धा वाट मिळायची नाहीं

झोप शून्यातल्या ससाराचें सौंदर्य दाखविते अति अल्प काळात अति जीवित घडवून आणिते

• • •

सावलीजवळून हातवारे शिकण्यासारखें आहे.

वीराच्या नम्र अर्धांगी आणि पडदानशीन अर्धांगी प्रतिपक्षीय वीराच्या सन्मानासाठीं सादर असत

मुलाचें नापास उत्तर आईबापाना मुलाना जन्म देता येतो, मरण देता येत नाहीं.

•

डोळ्यात प्राण एकवटल्ले म्हणजे तरुणाना अधरामृताची जरूर लागते.

प्रीति हा एक नेत्ररोग आहे.

कोंवळीं पानें, पाण्यावर काठ्या मारणें, एकसारखे धावत सुटणें नायक in प्रेमपिशाच

पाळण्याला आर्डिंग बांधणें.

पुष्कळ वर्षांनीं आपली जुनी शाळा पाहणें मुलें दगडाच्या पुतळ्यासारखीं मूक—दगडांनीं बोलणें—

देव दगडाचे केलेले आहेत म्हणूनच माणसाची त्यावरची भक्ति कायम राहते उदाहरणार्थ देव बोलतात अशी कल्पना ठेवून सभाषण देणें

आईबाप मुलाचीं लग्नें करीत पूर्वीं, पण हल्लीं मुलाचे आईबाप लग्न करितात.

मत्रांनीं जर भिन्न जीवांना एकजीव करिता येतो तर वकील मुनसफ न्याद हे कशाला ?

सुंदर विषयावरील बोलणें, बोलण्याचा सुदर विषय

हा सण खरा, पण सुतकात आलेला सण आहे

माझे डोळे फोडले तर मला स्वर्गाचा मार्ग दिसू लागेल वगैरे

आता पहिल्यासारखें काहीं तरी उत्तर देऊ नकोस आता प्रश्न विचार—

स्वताच्या सामर्थ्याचें अज्ञान हेंच फार वेळा पराभवाचें कारण असतें शत्रूच्या गुप्त बातम्या काढण्यापेक्षा स्वताच्या उघड उघड गोष्टी पाहण्याकडे लक्ष देणें अधिक श्रेयस्कर असतें

सोन्याचा सापळा मोत्याचा मारा, रत्नाच्या राशी याचे विरोध देणें

तुमच्या सैन्याच्या वाऱ्यानें आमच्या झाडाचीं कोंवळीं पानें सुद्धा हलतां हलायचीं नाहींत.

• • •

घड्याळाचे काटे सरकवून काळाला पुढे लोटता येईल काय?

• • •

मृत्युलोकची वस्ती इतकी क्षणभंगुर आहे कीं प्रथम चुंबनानें रंगलेले प्रणयी कपोल अत्यविरहाच्या अश्रूंनीं कधीं कधीं धुतले जातात.

• • •

तुझा हात माझ्या हातीं देणें तुझ्या बापाच्या हातीं आहे; पण हृदय देणें माझ्या हातीं सुद्धा नाहीं. तें हातापासून दोन हात दूर असतें.

• • •

गुप्त भाषणें आडून ऐकणाऱ्याला कधीं कधीं स्वताच्या विरुद्ध ऐकायला सापडून चांगलीच अद्दल घडते.

• •

गाडी चालू होताच आम्ही स्थिर झालों.

• • •

अनोळखीच्या जागीं मदनाचे बाण अचूक जाऊन लागतात.

• • •

एका वृद्धाची तक्रार—म्हाताऱ्याला काळाचे व मदनाचे बाण असा दुहेरी मारा सहन करावा लागतो; तुम्हा तरुणाना नुसत्या मदनाचेच बाण सहन होत नाहींत शिवाय निंदकाचे वाग्बाण—

•

ढालीएवढ कुंकू : कुंकवाची ढाल—निंदकाचे वाग्बाण.

• •

नवरानायकोची लग्नापूर्वींची व नंतरची स्थिति. हातात हात घालून फिरणें—हातावर तुरी देणें पायधूळ झाडली • डोळ्यात धूळ टाकणे वगैरे. चुंबन • चाऊ की गिळू

ज्याला मरण द्यायला हवें त्याला मी जन्म दिला —साबाजी.

•

जगद्रंगावरील हॅमलेटमध्यें आपण पिंगल्क वत्सनाभ वगैरे लोफर्स असतों हे पुष्कळशा मूर्खांना कळत नाहीं

•

अर्थशास्त्राची माहिती झाली म्हणजे हुंडा किती द्यावा याचा अदाज फक्त लागत नाहीं; इतिहासातली घराणीं पाठ झाली म्हणजे आपल्या घराण्याचा लौकिक लक्षात येतोच असें नाहीं.

. .

यामा, मदन नावाच्या जादूगाराने नजरबंदी केल्याखेरीज तिच्या डोळ्यातली जादू तुम्हाला कळायची नाहीं.

. . .

रूपीची वाग्गंगा महापुरात सुद्धा गढूळ होत नाहीं.

. . .

आपण किती लवकर चांगलें कुळ शोधून काढलें. मी सुद्धा त्या कुळातच —(आपली बहीण)

. . .

विमनस्क प्रतिस्पर्ध्यांवरील विजय स्वताच्या पराजयापेक्षाहि निरुत्साह करितो —वीरवदना.

.

शाहिराने दिलाची जीभ करावी लागते.

. . .

विशाल सौंदर्याचें आकलन करण्यासाठीं तितकेंच विशाल हृदय नाजूका साठीं नाजुक.

मूर्ति ही सौंदर्यभांडाराची किल्ली आहे. ईश्वराचें स्मरण करून देणारी स्मरणही आहे. चित्रें जर प्रियजनाची स्मृति करून देतात तर प्रियतमा साठीं—ईश्वरासाठीं मूर्ति, चित्र का नको!

. . .

स्वताच्या गुणाविष्करणापेक्षा दुसऱ्याच्या दुर्गुणावरच पोट भरणारे कंगाल सापडतात फार. ३

.

पैसा, मत्सर, मार हे सत्याचे बाहेर येण्याचे मार्ग

. . .

पाश्चात्य संस्कृतीच्या प्रथमदर्शनकाळीं ओळख करून घेणें हें काम होतें, आता तींतील ग्राह्यग्राह्य ठरविणें हें आहे.

. .

अ—तिनें माझा फार सत्कार केला.
ब—तो कदाचित् तिच्या उच्च दरजाचा परिणाम असावा.

. . .

स्वप्नें खरीं पडतात का ? दिनस्वप्नें.

. . .

गजबजलेल्या अंत सृष्टीला बडबडणाऱ्या बाह्य सृष्टीनें आपल्या कोलाहलानें गप्प केलें पाहिजे.

. .

काहीं (सारस्वत दैवज्ञ) जातींत गर्भार स्त्रिया आठव्या महिन्यात नाना प्रकारचीं—वेश्याचीं सुद्धा—सोंगें घेतात.

. .

महात्म्याचें मरण परिस्थित जीवन्मृताना नवजीवन देतें.

. .

मनोमन मिळणी; अंतरंगींचा उमाळा; अंतराच्या थरारत्या ल्हरी; हिरव्या पानाच्या नाजूक जगात.

. . .

आग लागली तर पळावें कसें; परीक्षेच्या वेळीं दिवस कसें जावें वगैरे काळज्या करणारा वडील भाऊ व वरच्या इयत्तेंत असलेला धाकटा भाऊ.
एकाचें दुसऱ्यावरील वजन.

. . .

वेदशात मुलीचें लग्न देवाशीं लागतें.
आतट्यरहित मनुष्याच्या कल्पना काय असतील,
बाजारगप्पा यावर विनोद.

. . .

तरुण दृष्टींत ज्यावेळीं सौंदर्याची साभिलाप निरीक्षणबुद्धी (लाजाळू) वगैरे अशी एक पानरचना (मुळात लहान, पुढें बदलणारी) करणें.

. . .

Geology चा स्टुडंट अशी कॅरॅक्टर आणणें; दगडाखालीं त्याला रहस्य वस्तु सापडणें. (भावबंधन)

. . .

सुनेला घरात आल्यापासून नावें ठेवायास लागणें.

. . .

कविता करणें हें सगळ्या जगात अवघड काम आहे.

.

Romantic character in company with a serious and a vagabond friend

. . .

*आपण genius आहोंत अशा रहिवाळ समजुतीनें ओळखीच्या* माणसाना चारचौघात पोरकट प्रश्न विचारणें. तारुण्याचा थोडक्याच खुलाशानें सर्व लक्षात आलेंसे दाखविणें. विचारताना मात्र लहान मुलाचें साधें अजाणपण व निर्मळपण दर्शविणें. ही Character वाढविणें : दोष दुसऱ्याला वीट आणणें.

. . .

क्षुल्लक गोष्टीस फार महत्त्व देणारी Character

. . .

मनोविनोदनार्थ मांडिलेल्या प्रयत्नात कालक्षेप हेंच मुळीं यश होय.

. . .

पारधी व शिकारी यातील अंतर.

. . .

शेरिडन १६९
कराराचा आवाज मला ओळखू येत नाहीं. Defend कालिंदी

नाटकातील पात्राना पुढील पराक्रमद्योतक विशेषणें आधींच मिळतील. ऐतिहासिक पुरुषाना त्याचे समकालीन इतिहासानें पुढें दिलेलीं विशेषणें आधींच देतात. म्हणजे Genius चें Appreciation फारच जल्द.

.

आडून ऐकणें. वाटेवर भाषणें घडवडणें. Stageच्या सोई.

. . .

वर्णनाची पद्धति : सूर्य वर आला आहे. काळोख पडला आहे जणू काय ही माहिती दुसऱ्या ग्रहावरच्या लोकाना देत आहे.

. . .

ऐन काव्यात स्वताच्या Science मधील Technical शब्द वापरून काव्य घडवडणें. पद्म, सुंदरि, कमळें, द्विदल धान्यें, रामाठा नावाची पर्जन्य खुल्या वनस्पति वगैरे

. . .

नट : रडविण्यापेक्षा स्वताच जास्त रडतात.

. . .

शैतानाची कल्पना आर्यधर्माला मान्य नाहीं.

. . .

अशा सुंदर प्रारंभाच्या चिंधड्या करावयाची इच्छा करणारा नाटककारा पेक्षाही लहरी असला पाहिजे.

. . .

मुक्या जीवाला जीभ लाभते.

. . .

हे विचार आज नवे आहेत; पुन्हा आठवले तर परिचयामुळें मी त्यांना शब्दांत पकडून आपणाला जरूर सांगेन. The fallen hero to the Divine Hero

. . .

Serious mood धारण करून दुसऱ्याचा रा. रा. वगैरे शिष्टाचार-पूर्वक उल्लेख करणें.

. . .

वीरांना परक्यांशीं व कवींना स्वजनांशीं भांडावयाचें असतें.

. . .

आपल्या शत्रूच्या चांगल्या गुणांशीं आणि मित्रांच्या वाईट गुणांशीं आपणाला झगडावें लागतें.

. . .

आपल्या मतावर जे विश्वास ठेवीत नाहींत ते काफर.

. . .

A good kind girl bringing round a vagabond, good at heart Hero and Heroine for a comedy

. . .

प्लॉट, character painting आणि हेतु यांत प्रधान कोण? पूर्वी कदाचित् मनोरंजन हाच नाटकाचा हेतु असेल; पण प्रगतिपर दृष्टीनें तत्त्व-निदर्शनात्मक उपयोग हा हेतु असावा हें रास्त आहे कीं नाहीं. ही तिहेरी जबाबदारी सांभाळणारा लेखक अधिक मोठा नव्हे का?

. . .

माझ्या कार्याकरितां मी जन्मलों आहे—प्रल्हाद.

. .

नारद व प्रल्हाद यांचा शेवटीं एक प्रवेश : आचारशास्त्रीच्या एका माळकऱ्याच्या निश्चयानें नाश होतो. हें प्रल्हादाचें जीवितकार्य.

. . .

दोन हृदयांच्या दृढालिंगनामध्यें त्याचा दुरावा होत नाहीं—(गर्वनिर्वाण)

• • •

देव तुझ्याइतका न्याय निर्दय नाहीं.—

• • •

एका फुलावर पाणी सोडल्यानाचून दुसऱ्या फुलाची प्राप्ती होत नाहीं. फळाची आशा धरावयाची झाल्यास फुलाची आशा सोडावी लागते. तरुणीच्या स्तनावर हात ठेवावयाचा झाल्यास मातेच्या स्तनावरचा हात काढावा लागतो.

• • •

आपल्याला महत्त्वाच्या वाटणाऱ्या पण कवडी किंमतीच्या गोष्टी दुसऱ्याला रगात येऊन सांगणें. अमरा मनुष्य माझ्यामुळें कपटीला लागला. ऐकणाराला सारा नाटकप्रकारच क्षुद्र वाटत असावा! ही Character वाढविणें.

• • •

Merchant

love-story = कीं समीलन पार पडताच तिचा interest संपला असता. परतु त्याच वेळीं Ring प्रकरण सुरू करून त्याचा शेवट काय होतो हे पाहण्याची उत्कंठा Love story चा interest कायम ठेविते. यांत Love story एक अर्धांचा नेवर स्वभावत च आगाऊ देणें हा असतो. पण त्यामुळेंच दुसऱ्या अर्धांचा उगम होणें हें कौशल्य आहे. cf शाकुंतल & मृच्छकटिक या दृष्टीनें.

•

नाटकाला व जीवनाला मुख्य चालक मनुष्याची विकारिता; otherwise व्यवहारधर्मांच्या नियमरेषेवरून जगावें लागलें तर प्रगति थांबेल.

शकुंतला impressed by दुष्यंत. हीच impression ability म्हणजे आत्म्याचा स्वायत्त निवसपणा. हिंदुधर्म पद्धतीनें हा फारच जखडला आहे. या विषयीं 'वाङ्मय' या विषयात लिहिणें.

•

आपला गरजूपणा दुसऱ्याच्या दृष्टीस पडण्यात कुलीन मोठ्या मनाला दुःख वाटते. इतकेंच नव्हे तर स्वाभाविक गरजाचा आपणावर परिणाम होतो हें मुद्दा दाखवायाचा मोठ्या मनाला संकोच वाटतो.

• •

घोड्याचें स्तोप घेणें.

• • •

मुलगा नाटकात आहे म्हणून झुरणारी आई. तिचा त्याबद्दलचा पूर्वीचा

आशापूर्ण अभिमान. नतर शेजान्यानीं हिणविणें. त्या मुलानें पुढें सर्कसमध्यें जाणें; love चें स्वरूप; मुख्य कादंबरीत की जिचें नाव "लालाराम."

. . .

लेखकाचा मत्सर; प्रसिद्धीमुळें मोगावी लागणारी कडक टीका. -"लालाराम"

. . .

व्यक्तिविषयक टीका, द्वेष वगैरे.
लालाराम ही कादंबरी माझ्या मरणोत्तर प्रसिद्ध करणें. तोंपर्यंत लिहिणें.

. . .

Leave a lesson or learn a lesson

. . .

तरुणी व दश आशा.
मायेचे शब्द.

. . .

सत्ययुगात सत्यवन् असण्यात विशेष काय? लंकेंत सोन्याची वीट बाळगणें
—वीरवदना.

. .

A Hero weak at heart of his own mistakes and trying to be useful to his people afraid of public criticism, finally overcomes fears and is honestly useful

. .

हातात हात घालून फिरणें, हातावर तुरी देणें;
डोळे = पायधूळ; डोळयात धूळ.

. .

Difference between a wife & harlot—

. . .

इतिहास = पराण्याचा लौकिक.

.

अलौकिक पुरुष आपल्या कार्याच्या जगातून सुखासाठी सर्वांना साधारणी भूत अशा इच्छेच्या क्षेत्रात उतरताच सामान्य जनाना त्याचें आपलें साम्य पटू लागत. या साम्यामुळें सलगी वाढते, जीभ मोकळी होते व अनादरात पर्यवसान होतें. त्याचें सर्व अलौकिक्त्व असेल अशी लोककल्पना असते. समानशील हें सख्याचें अतएव आनदाचेंहि मृळ आहे.

.

बायको म्हणजे मेणा झाडाचा पाला होते.

. . .

लक्ष्मी पुराणपुरुषाची चंचल स्त्री.

. . .

गर्भश्रीमंत तरुण किंवा स्वकृत वृद्ध यांसी भोगालच लक्ष्मीचा उपभोग घेता येत नाहीं. सायकॉलजी.

. . .

तिच्या तेजस्वी आशेमुळें प्रत्येक पिढीचीं कर्तबगार माणसें तिला कायमची शोभा देण्यासाठीं मनुष्यजातीला हितकर कृत्यें करितात हें देवाचें दूरदर्शित्व. सृष्टि.

. . .

मदन जादूगार. नजरबंदी : डोळ्यातली जादू.

. . .

कमळें; गुलाब वगैरे आपणच आणावीं लागतात. रूपगर्वितासाठीं.

. . .

अनुस्वारावरून लग्न मोडणें : तें मोडण शत्रु आले तरी चालू ठेवणें.

. .

गाडींत बोलताना एखाद्या बडबड्या म्हातारीची जीभ तुटणें हा उपकार

. . .

कुबेराला कर्ज देण्याइतका श्रीमंत : बादवा.

. .

शिकारींत इतकें awkward धावणें कीं पळत्या सावजानें जिज्ञासेनें पाहण्या —

. .

'जंटलमन'च्या हालचालींचे शास्त्र; कोट हात अलग उचलून काढणें, तोंडावर सुरकुत्या पडल्या तरी हरकत नाहीं पण कोटावर घडी; वाढविणें—

. . .

मराठींतील बहुतेक पत्रें मुलांकरिता आहेत. मोठ्यासाठीं नाहींत.

. . .

आपल्या पूज्य व्यक्तीबद्दल भलत्या ठिकाणीं अवास्तव जोरकस स्तुति करून तिला शत्रु उत्पन्न करून ठेवणारी character : तुळशीदास

. . .

ओळख नसली तरी ओळख कोणी लादलेली कबूल करणें. character (प्रभाकर)

. . .

पत्रिका : मुखचंद्र : चंद्र; धनराशी; वृश्चिक.

. . .

अवगुणाचा (दूषणाचा) भूषण म्हणून उपयोग करणें. पादरे केस.

. . .

सृष्टि निर्विकार आहे. प्रतिरव' चित्र.

. . .

मेव्हणा म्हणजे अर्धी बायको; प्रत्येक बाबतींत हात धरणें.

. . .

दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिणें : तिलांजली.

. . .

सन्यास व वृद्धपण.

. . .

चाळणीनें पहाणें

. . .

म्हाताऱ्या डायरेक्टरच्या प्राणत्यागाचा निश्चय—
नवा प्लॉट.

. . .

प्रेम आधळें : डोळे वटारून पाहणें.

. . .

असे मला वचन दे पाहू. हस्तस्पर्शाला संकोच करू नकोस. अर्धांगी व अंग.

. . .

बुद्धीनें मिळविलेल्या सत्तात्मक सार्वभौमत्वाची खूण जी राजमुकुट ती मस्तकावर असते व हृदयजन्य प्रेमाच्या स्वामित्वाच निदर्शनभूत हृदयावरच रुळणारी रत्नांची माळ असते.

. . .

प्रश्न—मग माझी चूक कुठे झाली ?

उत्तर—बुद्धीचा जो मान तुला हक्कानें मिळाला आहे तो प्रेमाच्या, हृदयाच्याहि जगात बुद्धीच्या गुणावरच, हृदयगुणावाचून मिळावा ही अपेक्षा करण्यात तुझीच चूक झाली.

. . .

अष्टपुत्रा सौभाग्यवती भव हा आशीर्वाद खरा होऊ लागला तर चौपट चाढीनें दुसरी पिढी चौपदरीची घनीण व्हायची

•

प्रगतीची चाल पायापेक्षा डोक्यानेंच जास्त करावी लागते; नाहींतर गोष्टी फारच पुढे गेल्यावर—

•

राया असेल तिथें सावली वगैरे. मनात असें येतें. आज सांगायचें उद्या

•

शिवबाचा शिपाई राया आहे.

•

स्वर्गांत वाङ्मय, धर्म वगैरे सामाजिक उपाधी नाहींत. स्वर्गांत अपुरल्या इच्छेनें जाऊन भागत नाहीं, म्हणजे पात्रतेवाचून भलत्या स्थळीं जाण्याची इच्छा करू नये. "*आमचा स्वर्गवास*" *या लेखाचें* बोधतत्त्व असू शकेल

•

नाकातोंडात पाणी जाऊ लागताच तोंडचें पाणी पळालें

• •

देवाभोंवतीं फेऱ्या घालण्यानें देवाच्या फऱ्यातून चुकता येत नाहीं

• •

अंक ४

स्वप्नात कालिंदीला उद्देशून वृंदावननें सांगणें कीं हें जर मीं केलें नाहीं तर माझ्या शब्दाचा वसुधरेला खरेपणा वाटणार नाहीं, शेवटी—

• •

Act 3

१ Humourous नूपुर, कंकण and किंकिणी, The fresh news नू० ऐकतो, सांगतो. *vague forms*

२ कालिंदी व वृंदावन मनात येईल ते करतील—

—रा. ग गडकरी
ता २३–२–१८

•

*दाढीमिशा मायाहार रिव्हून राहणें*

बुगला जीम का असते ?

एक प्रसंग.—

रोगी व नळ्या लावणारा डॉक्टर. गराड्यात रहस्य वेळोवेळीं सांगण्याची युक्ति—

. . .

वाघसर्पांची नख; दयामाया दिसलीच नाहीं; जन्मदाता खेरीज उपकार

घन. to लतिका

. . .

सुंदर जगावर दृष्टि टाकताना नवकलिकेला काय आनंद : वाढविणें

. . .

नथीसाठीं नाक टोचणें, कर्णफुलासाठीं कान टोचणें; शेवटीं कुंकवासाठीं कपाळ कोरून काढण्यासाठीं वगैरे—

. . .

फुलें रम्य म्हणून जवळ—
तारा चिरंजीव पण असाध्य—

—प्रभाकर.

. . .

भेटायची चोरी, मग चोरून भेट.—

. . .

पर्वत पाषाणहृदयी असला तरी नदीला सासरीं पाठविताना वगैरे—

. .

आपण केलेल्या गोष्टीप्रमाणेंच गोष्ट एखाद्या थोरानें केलेली असावी आणि तीबद्दल त्याची स्तुति होत असताना आपणाला त्या कृतीच्या अभिमानाबद्दल आनंद व आपणाला प्रकटपणें स्तुति न लाभल्यामुळे होणारा निर्दोष व अस्फुट विषाद हीं किती रमणीय असतात!

. .

वाघाची दात-नखें उपटून काढताना त्याला दुःख होत नसतें का?

. .

फुलाचा पसारा करण्यासाठीं वेलीला शिकावें लागत नाहीं.

.

पाताळात नेऊन गाडलें तरी हिऱ्याच्या खाणींतून गगनातील ताऱ्यांच्या तोडीचे हिरेच—

. . .

पडपाळाला पुरे यारतांना पाहिले म्हणजे चिरंजीवन व क्षणिक—

. . .

परंपराप्रमाणें उपजत जोड्या: महेश्वर ल. घने—

. . .

Moulton वरून सुचलेले विचार

नाटकाचें अतिशालिक नसावें, कारण रसहानि; व रोमँटिक नाटकाची प्रवृत्ती सर्व प्लॉट समग्र माहात्म्याकडे असते.

P. 77

प्रयोगाची प्रगति प्रमुगदृष्ट्या पूर्ण व्यावहारिक असलीच पाहिजे असे मोल्टनचें मत दिसतें. हें मत खरें आहे का?

79

A shylock painted without a tender side at all would be repulsive, he becomes much more repulsive when he shows a tenderness for human being

.

मांजर मारण्याबद्दल काशीयात्रेसारखं अखंड प्रायश्चित्त का?

.

गोव्यात कुणाचा अंमल?—दिवसा पोर्तुगीज व रात्रीं दारूचा अमल.

गोव्यात अजून वराह अवतार

. .

चार मन म्हणून यज्ञात पशूला किंवा लग्नात वधूवराचा वध केल्यानें पातक लागत नाहीं.

.

आपल्याजवळ मला काहीं सांगायचें नसल्यामुळें कोणतीही गोष्ट ऐकायला मी रिकामाच आहें. मात्र माझं हृदयही पुरतें रिकामें आहे हें आपण विसरू नका. नव्या नाटकाचें सूत्र—

नव्या नाटकाचें नाव · क्षितिजांतर

. . .

मिशा नसलेल्या मुलासाठी मिशा असलेल्या मुली शोधाव्या लागतील.'

. . .

हिरकणी विरहात विशेष चमकते.

. .

मुलींना मारुती फिरावयास गेला आहे असे सागताच खरें वाटणें; असा जिवत देव—

. . .

स्त्रियाच्या विद्धाताला सत्यापेक्षा सौंदर्याचीच जास्त मदत असते.

P B Bapat 29-12-16

. . .

स्त्रीमुळें. जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं मी ज्ञानी झालें.—

. . .

श्वासोच्छ्वास करावयाचा विसर पडून मरण यावें असे वाटू लागणें— विसराळू किंवा आळशी

. . .

विनयाच्या अतिशयाला आपण बुद्धीचा कमीपणा—

. . .

दैवघटना करण्याचे मार्ग : शर्यती, स्वप्नें, भविष्य, पिंगळ्या

. . .

शरीरावर ताग घेण्यात काय जीव नाही: जीव घेण्यांत तरी ...
—औरंगजेब व हिरोजी

. . .

साड्याना पदर का असतो!

. . .

देवी आलेली आई व फोटोग्राफर.

. .

एखाद्या अप्रसिद्ध व्यक्तीचे चरित्र लिहिणें

. . .

चरित्रपर नाटक लिहिणें is equal to अत्तर काढणें.

.

A calculating & quoting fool to be the humorous character in एकच प्याला.

. . .

ग्रंथकाराची introduction, भेट, मध्यस्थी वगैरेचें विनोदी वर्णन—

. . .

वाङ्मय व समुद्र याची तुलना.

. . .

जमिनीवर पाय पडताच कुरकुर करीत असे वगैरे—नवीन पायमल्ली होताना जोडा सुद्धा—

एका बाजूनें वाद करता करता दुसऱ्या बाजूला जाऊन मिळणें

•

उगाच गोष्टी वाढवून सांगणारें एक पान घालणें—अगदीं रुक्ष असें एक घालणें —

पाण्यात पाहतों कीं आगींत लोणवें आग पाखडणें—

वृक्ष आपली आतडीं भूमातेच्या उदरात ठेवितात

तारा हा स्मशानचा देखावा बघतात व मग थरकतात—

आशावादी आकाशातल्या ताऱ्याकडे नजर ठेवून भविष्यकालची स्वप्नें काढीत असतो व दिवस उजाडताच तीं स्वप्नें मावळतात व निराशावादी पायाखालचे खडे तुडवून दु:ख —

स्मशान-वृक्षाना आनंदाची माहिती काय ती सूड घेणाऱ्या मागसाच्या उत्कट आनंदावरून होईल तेवढीच, वगैरे एखाद्या मुलाचें हसणें या वृक्षानीं पाहिलें तर याचे देह मोडून पडतील

या उघड्या रंगमहालात मला कधीं तरी या ठिकाणीं यावयाचें आहे—

लाकडाच्या शेजेवर गोवऱ्याच्या गिरद्या रचून थडगार पडलेल्या अंगावर जळत्या आगीची भरजरी शाल पांघरून अखेर कालनिद्रा घ्यावी लागते

हृदयाची क्रिया बंद पडून एका क्षणाची—दिल्यावाचून जगाची भाडोत्री उठविणाऱ्या प्रेताला जाळताना काहीं लोक चिरंजीवाच्या ऐटीत पुढचे बेत करितात—

आमचें हें वृद्ध घशाखालीं पचनीं पडण हें कालकूट पचविण्याइतकें प्राणघातक तरी आहे खास

दिलपाक. सावळी सुरत. भोळ्या भावाची भाक. चिमुकली चंद्रकोर. मुकी माया, नव्हाळी नवलाई

. . .

लढवय्यानीं प्रेम करावें कसें याचें कुठें उदाहरण नाहीं

. . .

वाळूच्या शेतात तुरीची पेरणी.

. . .

पुराणातून स्त्रियासंनधींचा...
पंचतनापैकीं पंचतन हें...

. .

अठरा वर्णांचें कडबोळें अठरा आणे.

. .

सुंदर मुखचंद्रावरचा वलक बहुधा दुसऱ्याच्या वाटणीस जातो. नवऱ्याची रिमत त्याच्याकडे निरखून पाहण्यातच—

.

स्थिर तारा व मर्यादित जागेंत कोंडलेला मनुष्य याची तुलना—
करभरवाही मनुष्य व भरलेला गाडा वाहणारा बैल चनगति सोडता—
चक्रपदवी

. . .

बेळगाव, खानापूर
दृष्टि अगदीं कोंकणप्रमाणें
भाताचीं गावरें
जमीन पांढरी
शेतें चाढ्ण्यात वर्षा
कापाप्रमाणें
डोंगर पांढरे

खानापूर
रापडे पडलेल्या डोक्याप्रमाणें
घेरु = झाडें
मुळीं स्टेशन–मुळची झाडें
मध्येंच स्टेशनाची पाटी—

Inpression : कबरस्थानप्रमाणें वाटतें
चांदण्यात—
गर्दी नसल्यामुळें समज—विराम–
गवती माळावर शुभ्र पायऱ्या या
टेनिस कोर्टप्रमाणे दिस—

• • •

कडयाच्या वेली–
मम हृदयावर स्मृति—

• •

फुगडीचे उखाणे :

फुगडी खेळता खेळता जमीन झाली काळी ॥
माझ्याशीं फुगडी खेळते लेकुरवाळी ॥ १ ॥
पडवळीच्या माजीला डाळींबीचें भजन ॥
माझ्याशीं फुगडी खेळतें आगगाडीचें इंजन ॥ २ ॥

• •

याचवेळीं एकमेकींचीं उगीं काढणें. ओवीवृद्ध०—यायकाचे ठराविक शब्द—धूर्तांचा आहे,—बुडबूड आहे

•

१. हजाराचा घोडा ॥ त्याला पन्नासाची झूल ॥
वरी गुलाबाचें फूल ॥ दादा राया ॥
२. माझ्या दारावरून ॥ घुंगराच्या गाड्या गेल्या ॥
भावानें बहिणी नेल्या ॥ बीजेसाठीं ॥
३. काळी कपिला गाय ॥ कळपाच्या पुढें जाय ॥
शब्दाला उभी राह्य ॥ बापाजीच्या ॥
४. परिग रे दादा ॥ लिंबे घाल ताजीं ताजीं ॥
धोतरजोडा अमदाबाजी ॥ दादारायाचा ॥
५. पहिल्यानें न्हाण आलें ॥ हिरव्या साडीवरी ॥
मन्चर माडीवरी ॥ गुंफियेले ॥
६. पहिल्यानें न्हाण आलें ॥ हसता खेळतां ॥
मखर गुंफिता ॥ रात्र झाली ॥
७. दादाराया घोड्यावरी ॥ वहिनीबाई माडीवरी ॥
तेथून खूण करी ॥ विड्यासाठीं ॥

• • •

व्यसनी आळशावर वायकाची जीभ हें रामबाण औषध.
रानगावर जेव्हा सुटले असतील रामबाण त्यावेळीं जलमेवर रामबाण.
झोपेवांचून रात्री आणि कामावाचून दिवस.

. .

सत्याबद्दल विचार. जीभ ही जाया; औषध जिभेला रुचिकर पण गळीं उतरताना झोंबणारें.

. . .

गळा कापून नतर शिवून देणें.

.

हृदयात प्रतिबिंबित होतें त हृदयाचे तुकडे करून नव्हे जलाशयात पक्ष्याचें प्रतिबिंब.

. . .

हृदयाची क्रिया बद होऊन जगणें

. . .

प्रवेश—

भलतीच भाषा बोलण्याचें मिष करून कुठें तरी नोकरीस राहणें, व कारस्थानें ऐकणें, तीच भाषा बोलणारा पाहुणा येणें, (further) तोही त्या भाषेचा ढोंगीच, दोघाचें विनोदी सगनमत

. .

पाजी सुधारक पोरें प्रेमाची याचना करितात म्हणून स्त्रिया मुलींना स्वातत्र्य नसावें या हट्टानें बापान मुलीचा मराठी भाषेशीं सबधच तोडणें.

. . .

चेहऱ्याला रग लावणें म्हणजे अश्रूंचा हुप घालविणें.

. .

सुतकाचें प्रथम स्नान, धसा कोरडा, डोळ्यांतून अखड धार—

जरूर नसेल त्यावेळीं धगा राहून दुसऱ्याच्या संभाषणात त्रासदायक होणारी Character—

.

विरहावरयेंत ओला दुष्काळ. कोरडा नसतो.

. .

In गैरसमज introdnce
a nurse for the delivery of the

sister in disguise
नसल्या चदक्शा हें एक गैरसमजाचें अग

ज्याच्याजवळ मुळींच पैसे नाहींत असे धनी व नोकर  नोकराची दशा
आता मी याना धनी का म्हणावें ? धनीसाहेबाकडे माझी बाकी—

अपराध कबूल करताना उपमाअलंकारयुक्त बोलणं—

A lover to his friend —आता माझें तिच्याजवळ थोडें काम
आहे. तिच्या बोटात घातलेली आगठी आणि पार्यी वाहिलेले पत्रप्राण परत
घ्यावयाचे आहेत

Gentleman होण्याचे मार्ग विचिंतीत असणार पात्र—

हा तिच्यावर प्रेम करतो  याची मान उतरून टाकायीशी याच्ने पण जरा
अडचण आहे—

स्वताच्या सामर्थ्याचें अज्ञान हेंच फार वेळा पराभवाच कारण असतें
शत्रूच्या बातम्या काढण्यापेक्षा आपणाकडे लक्ष—

सोन्याचा सापळा—मोत्याचा मारा—रत्नाच्या राशी—तुमच्या सैऱ्याच्या
वाऱ्यान झाडाचीं पानें हलायची—

An absurd presentation  सुदरच्या lover नें तिच्या धाकट्या
बहिणीचे लग्नाचे वेळीं आमत्रणाची मानकऱ्याच्या रस्त्यानें वाट पाहणें

भविष्य आपल्या हातीं आहे अशी खरी गोष्ट असली तरी त्याच्यासाठीं
ज्योतिष्यापुढें हात पसरणें नामर्दपणाचें आहे

ज्योतिषी व वैद्य याच्या समसमोर पाऱ्या असतात

सायरन्जर शरीरापेक्षा मनाचा तोल संभाळणें कठिण

घालणें—डाव्या हातानें कपाळ दाबून धरणें—बोलताना एकदम अपरिचितांशींही एकेरीवर येणें—गोपाळराव दाते—भावेस्कूलचे चिपळूणकर—नगरचे डोअरकीपर—आगगाडींत भेटलेला म्हातारा—अभिनयासह नाटक पाठ म्हणणारे जोशी. .

. . .

स्वार्थाचें उदाहरण—अमुक मनुष्य मेला हें ऐकताच, अरेरे, त्यानें रेकानें व्याज अखेरीस बुडविलें—

. . .

आगगाडींत संध्या करणें.

. . .

संजयी—डोळे मिचकावणें—कोपरखळी देणें, थुंकणें. रस्त्यात बोलताना जोडा काढून ठेवणें.

. .

बोलण्याचे प्रकार :

वाशिमकराचें दुसऱ्याला खुलविण्यासाठीं खालीं पाहून हात चोळीत स्तुतिपर बोलणें—मध्येंच हः हः करीत स्तुति करणें. अहंमन्याचें अडखळत निसरत बोलणें.

. . .

गड्यांचे प्रकार :

निजाना घालून निजणारा, शालजोडी पांघरून निजणारा गडी, धन्याचे कपडे घालून जाणारा गडी.

. . .

जोग मास्तराचें बोलणें ऐकणाराचे छातीवर टिचक्या मारणें—

. . .

Elder Pliny ही व्यक्ति आंघोळ करताना, जेवताना, फिरताना सुद्धां कोणाजवळून तरी वाचून घेत असे. विचाराला वेळ कधीं फावत असे!

शॉपेनहर

. . .

विचार व वाचन यांची तुलना.

गेटेगोरचा एखाद्या सीन वर्णनें: चित्ररंगीच्या वृद्ध गृहस्थाचें गरगोल्ड—

. . .

विवेकानंद नाटक :
पान ७ मारवाडी काव्य दरितो.
११ विनोद मार्मिक
'व' बद्दल लिहिणें. भाषणात 'व' नको—
१२ विनोदी सोंच....प्रयोजन नाहीं.
प्रवेश २ रा : स्थळनिर्देश नाहीं—
(वियोगिनीनें हिंदुस्थान सोडणें स्त्रियांना शोभण्यासारखें आहे का !)
वियोगिनी स्त्रीवेषात येणें अवघड—
(कर्त्यांच्या......पणामुळें ज्या भानगडी स्वच्छ असतात त्या लोकांना मुळींच कळत नाहीं, त्या कौशल्यानें कळविण्यात कला आहे.)
प्र. ३ : स्थळनिर्देश पुन्हा नाहीं.
मत्सरानें स्वगत हें चऱ्हाट वळण्याचा प्रसंग काय ? मुद्दाम सांगितल्यासारखें वाटतें. मत्सर व असूया याची कहाणी व क्रिया असंभवनीय व अप्रयोजक—
प्र. ४ : स्थळनिर्देश नाहीं—
प्र. २ व ४ मध्यें काळ किती गेला ?

. . .

ह्याच मुलाचा बाप—
Tragedy करणें कीं कॉमेडी ! Comedy—

Hints for Character Sketches

विद्यार्थ्यांचें वर्णन—आपण सुधारलेले आहोंत असें दाखविण्याचा प्रयत्न—तुटक बोलणें—कोणत्याही गोष्टीचा खोल विचार न करता इर्वेत शब्द उडविल्यासारखें बोलणें—

. . .

स्वयंसंतुष्ट मनुष्याचें आत्ममहत्त्व—ज्योतिष्याला भविष्य विचारणें—मी डॉक्टर झालों असतों तर गरिबाचें तरी कोटकल्याण झालें असतें—

. . .

मनुष्याच्या विशेष संवयी—रागीट अहमन्य मनुष्य नाकाचा शेंडा झटझट हातानें हलवितो. पंडितमन्य—दुसरा बोलेल त्यावर विशेष बोलावयाचेंच—हात पुढें आपटून—बोलल्यानंतर "कैसा बनाया" असा चेहरा करून सर्भोवार पाहणें—विचारमग्नाचीं लक्षणें—मिठाई खाणें—मिशा हातानें हालविणें—कोपर मागें नेणें—शून्य दृष्टीनें पाहणें—आंगठा सोंडात

घाल्णें—डाव्या हातानें कपाळ दाबून धरणें—बोलताना एकदम अपरिचितांशीही एकेरीवर येणें—गोपाळराव दाते—भानेस्कूलचे चिपळूणकर—नगरचे डोअरवीपर—आगगाडींत भेटलेला म्हातारा—अभिनयासह नाटक पाठ म्हणणारे जोशी...

...

स्वार्थाचें उदाहरण—अमुक मनुष्य मेला हें ऐकताच, अरेरे, त्यानें ऐकानें व्याज अखेरीस बुडविलें—

...

आगगाडींत संध्या करणें.

...

संयमी—डोळे मिचकावणें—कोपरसळी देणें, थुकणें. रस्त्यात बोलताना जोडा काढून ठेवणें.

..

बोलण्याचे प्रकार :

वाशिमकराचें दुसऱ्याला खुलविण्यासाठीं रात्रीं पाहून हात चोळीत स्तुतिपर बोलणें—मध्येंच हा' हा करीत स्तुति करणें. अहमन्याचें अह गळत विगरत बोलणें.

...

गड्याचे प्रकार :

निजाना धाडून निजणारा, शालजोडी पांघरून निजणारा गडी, धन्याचे कपडे घालून जाणारा गडी.

...

जोग मास्तरांचें बोलणें ऐकणाराचे छातीवर टिचक्या मारणें—

...

Elder Pliny ही व्यक्ति आंघोळ करताना, जेवताना, फिरताना सुद्धां कोणाजवळून तरी वाचून घेत असे. विचाराला वेळ कधीं यादीत असे!

शॉपेनहूर

...

विचार व वाचन यांची तुलना.

गंडेरांच्या एखाद सीन वर्णणे: चिंचवडीच्या वृद्ध गृहस्थाचें गृहसौख्य—

...

मद्दिनतरान याची भूगोलविषयक माहिती.

. . .

अशी एक कॅरॅक्टर आणणें; कादंबऱ्यातल्या गोष्टी स्वताच्या आयुष्याला चिकटविणारी—

. . .

पूर्वकालातील प्रिय चित्र पाहून सुचलेले विचार—

. .

Character—picture for young शानु · S D Karve

. .

तेल कुठं लावू नकोस. तुझ्या सासूला नाहीं आवडत तिच्या घरीं चाल नाहीं. तू आहेस काळी मुलगी ॥

इतकें काहीं तो मला त्यावाचून चैन नाहीं। पावसाची पडली भावना!

.

वायकाच्या तोंडाला सोनेरी चाप—अलंकार म्हणून. कनक व कांता—एक नादपूर्ण व दुसरे मुके.

सत्याची अस्ताव्यस्त बेपर्वाई; खोट्याची काटेतोल सावधगिरी. खोट्या मोत्याचा गोलपणाच संशयास्पद होतो, कवितेतील शब्दांची रेलचेल वगैरे.

.

सुंदर स्त्रियांच्या मानेवर हात शत्रूच्या मानेवर हात

.

मुखचंद्र . चंद्र सूर्यतापानें फिका पडतो

. . .

सूड = दारू, प्रीति = दूध

.

महाराष्ट्र वाङ्मय = मधमाशाचें पोळें आहे.

अर्थशास्त्रदृष्ट्या स्त्रीची उत्पादकशक्ति केवळ संहारक असते

. .

राधाकृष्णाची लहान होण्याची गोष्ट बदलणें.

. .

द्रौपदीनें नाव घेताना समुच्चयवाचक नाम.

. .

पुरुषानीं बायकांचीं नावें न घेण्याचें कारण. श्रीकृष्ण व धर्म यांची गोष्ट.

• • •

शत्रूच्या शिपायापासून शहराचा बचाव करणाऱ्या लष्कराला स्वतःच्या शिपायापासून स्वतःचें घर सभाळता येत नाहीं.

• • •

काहीं विशेषनामांचे संघ
याजुद्दीन, व्यासेतीळ, रमजान व नाताळ.

• • •

I तुकडींचे तुकडे तुकडे—
II चंद्राच्या जाण्याचा मार्ग सर्वांच्या पाठ आहे—

• • •

वाटेला जाणें वाट लावणें

पृथ्वीच्या तुलनेनें मानवी खेळ मानवी जीवनाशीं त्याचे विचार—

• •

बुद्धिमान सौंदर्याबरोबर सहवास
आपल्यापेक्षां लहान पण आपल्याला ideal समजणाऱ्या प्राण्यादेखत एखादा वेडावाकडा शब्द बोलण्याची धास्ती वाटते.

भूपाल अंक १

• •

त्याचे डोळे इतके तांबडेलाल दिसू लागले की, पतंगसुद्धा दिव्याला सोडून दिव्याकडे लागले

• • •

शिपायांच्या बाणांनीं डुलणाऱ्या आणि अश्रुसिंचनानीं वाढणाऱ्या या स्मशानस्थानां आदर, हसणें वगैरे गोष्टींची कल्पना तरी असेल का? यादविर्ग—

• • •

वस्तु कितीही लहानमोठी असली तरी प्रतिबिंब काचेच्या प्रमाणानेंच तिचें चित्र कॅमेऱ्यांत यावें, त्याप्रमाणानें लघु हृदयावर गुणांचें चित्र यथास्थल उमटावें यांत नवल तें काय?

•

कांहीं लोक इतक्या हलक्या प्रवृत्तीचे असतात कीं दुधाच्या पोटांत धाराधारा धार घात गेले तरी त्यांच्या पोटांत दुधू लागतें—

• •

दुतर्फा पसरलेल्या या वनश्रीच्या सौंदर्याला अग्निरथवेगामुळें आमच्या दृष्टीनें क्षणभंगुरताही जोडीस मिळाली. क्षणिकता हेंच सौंदर्याबद्दलची उत्कंठा वाढवते ' तारका ' चिरकालीन सौंदर्य म्हणून दिव्य

• • •

रात्रीं एखाद्या खोल विहिरींत दोर सोडून भांडें तळच्या फत्तरावर आदळलें म्हणजे जो आवाज निघतो तो ज्यु काय शांतिभंग केल्यामुळें फत्तराच्या गुरकावणीप्रमाणें वाटून छाती धडाडते.

• • •

तिच्या कोमल हाकेचा प्रतिध्वनि ते पर्वत पाषाणहृदय नसते तर त्यांनीं बाहेर पडूं दिला नसता वगैरे—

• • •

लोखंडाची कांब वाकन नाहीं पण वाकणी म्हणजे मात्र कायमची

प्रकरणाचा आरंभ करणें (एखाद्या कादंबरीचा) शकुंतला भेटल्याला इतका वेळ का, कीं तो रागावलेला पाहून आपणावरच तो रागावला आहेसें वाचकास वाटेल वगैरे—

अमुक एक मनुष्य शिव्या देत आहे वगैरे introduce करण्यासाठीं वाचकास त्याच्या घरासमोरील रस्त्यावरच्या आचकट शिव्या ऐकविणें व नंतर transfer करणें—

शहरात आलेल्या एखाद्या आचरट मुलाला काहीं विडी वगैरेचें भय नाहीं का वगैरे—

दारू पिणाराची फिलॉसफी—प्रसंगी आसइष्ट उपयोगी पडतील कीं भाऊनद ! वगैरे fact

आग लागली तर पळावें कसं, परीक्षेच्या वेळीं परमाकडे लागल्यास काय करावें वगैरे Fact

तुझी प्रतिमा माझ्या हृदयांत असती तर दुष्ट विचारानीं करपून गेली असती
—वृंदावन

• •

लग्नप्रसंगीचीं मंगलाष्टकें. चतुर्दश रत्नें इतक्या भिन्न प्रकारचीं आहेत म्हणून त्याचीं नावें सांगून वधूवरास परस्पराविषयीं सावधान होण्यास सांगतात.

. . .

मंगलाष्टकांत गंगासिंधुसरस्वती वगैरे नद्यांच्या यादींत वधूच्या गंगा यमुनाचीं नावें नसणें —झेलम

. . .

मग्जी, चतुर्दश रत्नांचा श्लोक कसातरी म्हणत होते, जणु काय आपलें नाव नाहीं म्हणून.

. . .

नारळांत काय पाणी असतें हें आपटल्यावाचून समजत नाहीं, डोक्यांत काय पाणी असतें हें थप्पड दिल्यावाचून ..

. . .

म्हशीसारखी बायको मिळाल्यामुळें एका मित्रानें कडबा भेट पाठविणें.

. . .

एक डोळा, एकाग्र दृष्टीनें जगाविषयीं विचार.

. . .

अल्लडपणांत मातृपदाची गंभीरता धारण करण्याचा प्रसंग वगैरे

—भूपाल वसुंधरा
(पुण्यप्रभाव)

. . .

फायदेशीर मनुष्य, पानें घेतांना पावत्या घेणें—टांगेवाल्याशीं भाडें ठरविलेलें सुद्धा रजिस्टर करून घेणें

. . .

खादाड गृहस्थ प्रत्येक गोष्ट खातो.

. . .

न्यायदेवतेजवळ प्रेमाच्या बाबतींत न्याय मागणें.

. . .

देवाचा प्रसाद, बुक्का, बंद्वे—

. . .

पत्नीच्या तोंडाला तोंड देणें वगैरे.

. . .

जानव्याच्या स्थितिः गळ्यांत, कमरेभोवतीं, विजारीच्या नाडीला, बुद्याच्या लेसीवर.

. . .

सुतानें स्वर्गांत जाणें; पाताळयंत्री वगैरे. सुतानें जाण्याची कल्पना ब्राह्मणाची—

. . .

श्रामवर्ग आकाशाकडे पाहणारही नाही.

द. म. तरु

. . .

हा झरा म्हणजे एखाद्या नदीनें पुरलेलें मुलाचें प्रेत–कोरडा झरा असावा.

कालिंदी—पु. प्र.

. . .

गजबजलेल्या अंत:सृष्टीस बजबजलेल्या बाह्य सृष्टीनें आपल्या कोलाहलानें गप्प केलें पाहिजे.

. . .

मुलगा रडत असताना त्याचे ते पाणीदार डोळे. धन्यास्तदंगरजसा मलिनीभवंति ॥

. . .

आईच्या अश्रूत भिजत असता हसणाऱ्या मुलाइतकी आनंददायक वस्तु एखादीच असेल.

. . .

जगणाऱ्या हृदयाच्या देहासमोर; ईश्वरशून्य देहातून आत्म्यानें अंग काढून घेण्यासाठीं अवतरलेल्या पंचमहाभूतासमोर—

. .

थोर पुरुषाच्या निकट सहवासात लहानपणीं राहून कोणीहि मोठवी मिळवीत नाहीं.

# अभ्यासाचीं टिपणें

मर्चंट ऑफ व्हेनिस

रायडल्स

एव्हरि मॅन इन हिज ह्यूमर

नामदेवाचे अभंग

प्रेम या विषयावर विचार

ग्रंथावर टीका

कथानकसिद्धीसाठी येर ना peculiarites देण्यांत येते, पण एकाच peculiarities चा एकच उपयोग हे निदान नाहीं हे आवश्यक असत एकच कारणासाठी introduce केलेल्या peculiarities चा आणखी उपयोग करून घेणे याच नांव economy याच विषयाचा आणखी constructive दृष्टीनें विचार करणे विशेषत plot रचतवेळीं

सूचना —प्रत्येक कॅरॅक्टर strike होते वेळीं तिच्यापासून होण्याजोगे incidents शोधून तयार ठेवावे

पान ४८ Anto abusing Shylock and thereby violating dignity

cf द्रौपदी laughing to दुर्योधन & सीता to शूर्पणखा & the resulting consequences

हलकीं व दरिद्री माणसें प्रयत्नानें पोट भरण्याच्या पदवीस येताच त्यांचे थोरांशीं (त्यांच्यात मिसळण्याच्या हेतूनें) उद्धटपणा व (दूर होण्यासाठी) कनिष्ठांशीं उद्दामपणा स्वयपूर्णता— गडकरी ने दत्तोपंताबरोबर आले होते रागिणी

•

सामान्यातून एकदम नाजूक सरकण्याची सवय कधीं यशस्वी झाली तर कधीं अपयशी व्हायचीच

46 2 para 1s 3 This 1s debatable

Difficulties before the Author and how he over comes them would be a very interesting subject For this end peculiarities in characters & customs in civilization are introduced in the play Think on this

Bassanio वर पैशाचें एवढें संकट काय आलें होतें ? तें अपरिहार्य दाखविलें असतें म्हणजे दोन गोष्टींचें एकीकरण बरोबर झालें असतें

Nemessis शाय ला त्याच मार्गानें उलट शिक्षा झाली असती तर नेमेसिस सर्वांगपरिपूर्ण झालें असतें मुलगी निघून जाण्याचा तरी Bond शीं संबंध कार्यकारणभावानें दाखवावयास पाहिजे होता

p 46 प्रारंभीच्या चार ओळी This idea is psychologically defensible एकदम rise & एकदम fall.

सुचलेले विचार Original
Always work up to climax in the slightest
cf Act I, scene II, page 9, lines 56 to 58 M V

What about the progress of the plot in the I and second scene ? Only acquaintance of the subject and characters minutely exposed That is the result

In the beginning always character to be explained in Dialogue further in action (give your own reason )

In his moods- घेतात ? How would translate the idea ?
Climax—1 2 78 82 R A Read Again
Read Nerissa s defence of Portia's father's arrangement Such things have to be used in avoiding the inevitable difficulties of the plot
× see below the general note

General Note

In arranging a plot the author is always hurrying to the desired situations, which struck him insinuated him to take up the perticular story The important yet unnecessary process he deals with in a hurried manner—उदाहरण see X

I. 2 - Dialogue brisk when action slow. cf रघुवंश—सिंह & दिलीप.

I 2 : Serious charge against the construction of the plot humorously evaded Lines 86-91, and the same charge evaded by a feat of argument just below in Nerissa's explaination, असे त्या लोकानीं सांगितलें नसतें तर !

P. 100 (1-2). Portia's dignity not lost up. This very surface gaiety of hero, enables her, of al—lot to look to the literal meaning of Jew's Bond

See plot trick 1 2 104-6 Bassanio awkwardly introduced 1 2 107

1 2 107 As I think. cf सरोजिनी, मूकनायक

104 & 7 The more absurd the case as N opens the subject & Portia passes the remark in line 109 supra

1 21 09-11 See the awkward nature of the process

1 2-116-17 See the futile reason to break up the scene

118-19 Plot moving in so idle manner—scenes 1 & 2 show no progress of the plot of a serious type

• • •

Act II

I A. week's interval between 1 & 2 acts P 18 41-42 Why this condition ? stupid प्रवेशामुळें प्लॉट मुळींच सरकत नाहीं.

•

II Launcelot discussing about conscience etc

Launc gives no immediate cause for the intended change

• •

Launc चा बाप त्याचा शब्द ओळखीत नाहीं. Defend कालिंदी in 4th act

Launc ला सोडवून घेण्यांत purpose काय !

•

P 24 A this sort juncture is quite favourite with shakespeare cf Hamlet The old man—

• •

P. 24 B : How clear is B's character and exposition of Human nature

• • •

सत्रध दुसऱ्या प्रवेशात प्लॉट मुळींच सरक्त नाहीं. Main story थोडी असल्यामुळें क्षुद्र Progress सुद्धा अशी रंगवीत नसणें फ़ारच भाग पडलें आहे; cf पौराणिक नाटकें.

• • •

Shylock बाप & जेसिका मुलगी. जनक व अपत्यें एकमेकासारखींच असावीं असा नियम नाहीं.

• • •

प्र. ३ शेवटचा जे. चा निश्चय abruptly आटपावा लागला.

• • •

प्र. ४ मुख्य दोन धाग्याविषयीं उल्लेख नाहीं.

• • •

p 24 2 Shylock is made to look a villain but he seems to be a childish fool cf his reason of going to the feast

A better reason for his going to the feast would to credit to the author

• • •

प्र. ५ जेसिका मानगडच.

प्र. ६ जेसिका Again. शेवटीं Antonio brought in for a few words and that too, to suggest an action of the second Hero

Scene 7 at once to Belmont weak in plot interest

Scene 8 Venice Jessicca gone & the news made known to the audiance

Scene 9. Belmont and Basket Business Drama still not vital

Act III

Scene I forebodes evil to 40 15 of Salar's lightness with Scene I and see the continual of the characters and mark the dif with Salanio See also Salar's opening speech to the jew (mark C) mark all C remarks in this scene and contrast them with Salanio's remarks

• • •

दाचीं पाऱ्नि वाक्यें शायलॉकच्या मना तापवून ठेवतात. शेवटीं Salar. एक अगदीं उघड विधान करून त्याच शायलॉकच्या मनःस्थितींत Antonio-च्या उल्लेख करितो. शाय.ची ही मनःस्थिति करून घेण्यात व नंतर हा विषय उघडण्यात Au. ची खरी कुशलता. या मित्राचे हितसंबंध खरोस —शिवाय पहिल्या वाक्यातून flesh & blood हे शब्द प्रामुख्यानें पुढें आणून नंतर Ant. चा विषय. extend thinking on this beautiful arrangement.

41 50. Smug : This word expresses completely the view of Shylock re Antonio, which was only hinted at in the first scene : "How like a fawning publican" etc

41-4 2 : P. 45 to 64 Best timed

Scene 2. Contrast this scene with first, of two friends one totally falls & other at his highest.

45 25-28 See Bassanio's lightness Though almost reminded he is not though shocked

48 B's thoughts on the picture out of place ?

50. 117-119 : Nerissa's conditions from the greatest to the smallest incident, this play is full of Chance & Uncertainty.

52. 239 ऐन दुःखात कोर्टाचें उदाहरण.

52. : 241 to the end of para Portia's natural tendency to observe & cleverness in observation—charater

54 301—303 Portia बायकी विरह वगैरे काहीं नाहीं.

Sickly poetry तिजजवळ नाहीं. पण स्त्रीहृदय मात्र आहे. पदा प्रारंभ या प्रवेशाचा.

## Sheridan's points

## Rivals

Characters peculiar and naturally creating Humour and attractive elements

Faulkland Fag

cf. Sir Peter Teazde and his wife with सरस्वती & आनंदराव

जोसेफ सरफेस= हरिहर & मनोहर

Ferdi and Lopez = विलास & वंचक
Decucene resembles गुलमच्या
3 A ५६ Plotसाठीं एकदम Amanda too confedential केली आहे.
नंदन कंदन इंदिरा (सावेपणा) मदार वगैरे
hints taken from a trip to Scar-borough.

• • •

act I
G. C. बीज
Fag secrets दुसऱ्याला सहज सागतो. Defend कंकण & others telling news to each other—

• • •

Absolute(captan)यानें Fagवर विश्वास कसा ठेविला. प्लॉटची सोय.

## Ben Johnson
## Every man in his Humour

पात्रें. lighthearted=चवथा अंक ९/१० प्रवेश; पाचवा एकच प्रवेश
ब्रेनवर्मने बापाची बाजू सोडून लेकाला मिळून रहस्य कां सागावें? नाट्याची सोय.
ब्रेन.च्या वेषांतरात कोणीच आवाज न ओळखणें.
रमणीनें वडलाला servant म्हणण्याची वहिवाट.

• • •

## नामदेवाचे अभंग

### भाग ६

अवतारासी आले. रामराज्य करणें–सयाचा विस्तार तोची बोलनिता.
अनुष विषय (        ) असस्याचा आटोपता नाहीं. मन हृदयरसीं (नरणी) समरसलें.

जी घरू जाणे चित्ता। वचन भ्रताराचें॥

डमाई = दम धरिलें न साहिती.

गोवळयाचे खेळीमेळीं जीवानें वीद घेतला. आपली सोय धरणें = व्यवस्था करणें. एखाद्या गोष्टीची घोकणी घेणें. चद्रबळ लाभलें.

साकडें फेडणें. कळाईत. नावाचें महत्त्व वाढणें. पुरुषार्थ भंगणें (अमक्याचा). संस्कार करणें (प्रेताला), आकटमर; जळशोष, पुण्यप्राणी, साड करणें, नादिवंत काया, कल्याणाचा काळ, निवडून टाकणें, दोघाचा मावार्थ ऐकिला, निर्वाण पाहणें (अत.), देह करवतीं घालणें, सिद्धाताची गोष्ट, थोर नादणूक, अतर जाणणें, संसार परता सारणें, देहपात. विचारणा. नामिकार देणें : हाकारा करणें, हाक मारणें.

. . .

## भाग ७

(जिवानें) वेद सोसणें, हाकारा करणें, झडपणें (भुतानें), अधकार फिरला, रूपाला आलें, खेळिया; अमक्या (गावचा) टाव सोडून, कृपणाचें दार धरून काय फळ ? वेगळेपणें, डोळ्यावेगळा होणें, सांवळ्या तेजानें डोळ्यात दाटणी करून, वार्ता मावळणें. विधीचीं अक्षरें, तनमनाला भुलवणी पाडणें, विकरा, पुकारा करणें.

. .

## भाग ३

जन्मातरीं सचिताचीं साधनें केलीं, सार्थक झालें, कोटिराशी = अगणित. बुद्धीला पालट. जीवाचें जडभारी. ओलावलें. लक्ष्य लावणें. साकडें पडणें. जळगार. रजवण. सृष्टि सांवरणें. नजर पुरणें, जिवाची वासना निवणें. (कडू) काळाला देशोधडी लावणें. (पायला) एखाद्याची प्रौढि बोलणें. दरारा लावणें, अकळ करणी. सज्जन जीव—(पायाशीं) आधार करून राहणें उच्चारण (गा ) आठव. काजळी पाजळी (विद्येची). (संचिताची) सामग्री. मौनावलें, विपरीत करणें. जातिवत श्रेष्ठ जातीचें गावाला शीव नाहीं. (गेल्या गोष्टीचा, गुजरीचा, गुणाचा) गौरव (गाणें), कर्मकांड मान्यवती.

शकुन ऐकणें, प्रौढि विकणें, वाणें (वर्णें = रंगें) तें गावळी नामें ते श्रीधरा. पान्हावणें. दुभावया = दूध काढायला. थोर ख्याति केली, आपल्या मेळीं मेळविणें; अतरमाळा = आतड्याच्या माळा अधकार फिरला = पहाट फुटली.

नाम. १९२०–२०२१·१०१ अभंग.

उदंड देव देसले. रोदुर शेरणीचे धणी असं—आर्त पुरविणें; पापिष्ट. वाटपाडे घर खाणून घेतलें. थाचा विटाळणें. काळ फासावीस भरील. दिगंवदृ=कर्मी दर्शाचे. ल्टक्या लैसिरावी राज—जीवनकळा; कल्पकोटी (संख्यातीत) पांडुरंग, सोईरा जोडणें; तोच भक्त सर्वांहून निराळा, सर्वांहुनी वेगळा भोगी प्रेमकळा, तरी राजकळा भस्माचा उधळा. भुलवणी. घराचार =घरात राहून सधार करणें. देशवटा अमुक जागा राहून येणें. कायाक्लेश. नयनासी निधान अंतरलें. कोटी कुळें उद्धरून जातील.

. . .

पायरव. झाला तर देव वाटतील आणि तीर्थें भाटतील. सोडवण करणें-होणें. बहात्तर खोडी. कल्पतरूच्या कळामुसरी. देव सत्वाला पावले. लोचन निवाले. निरखुनी निवतिल नयन, सुखाची सोयरी क्षेत्रवासी. कोणापुढें खती सारणें. घर्डीमराचा राग पाहुणा. जन्मान्तरें अशीं अनिवार :

. . .

पान ४६४

पाटावाची साडी. अमक्यावेगळें कर्म. तट (नाम); महिमेचा (मोठा मनुष्य) होणें. कल्पकोडी (केव्हाही) न सरे. सेवा अंतरणें. सुखाचें होणें. सोडवण. जनासी वैराग्याचें अंतर दाखविणें. लौकिक मिरवणें, धावणी करणें; उघडा पवाडा=सरळ गोष्ट. देहाला दडणा (नाम) स्वभावगुण सोडणें. देह-वत जीव. नि शाप होणें. उणीं उत्तरें.

•

## लग्न या विषयावर विचार

१ लग्न म्हणजे काय? हिंदु व्याख्या–इंग्रजी व्याख्या–हिंदूखेरीज इतरांच्या व्याख्या—

२ लग्नापासून फायदे आहेत काय? व्यक्तीचे फायदे, समाजाचे फायदे, भावी समाजाचे फायदे, मनुष्यजातीचे फायदे.

३ लग्नापासून तोटे आहेत काय? व्यक्तीचे तोटे, समाजाचे तोटे, भावी समाजाचे तोटे, मनुष्यजातीचे तोटे.

४ लग्नापासून होणाऱ्या नफातोट्याची तुलना. नफे किती आहेत, तोटे

किती आहेत? त्यातून चिरतर परिणामक कोण? आधुनिक दृष्ट्या व चिरतन-दृष्ट्या.

५ लग्न नैसर्गिक आहे की कृत्रिम आहे?

६ लग्न आवश्यक आहे काय?

७ आजन्म लग्न, मुदतीचें लग्न, केवळ व्यावहारिक लग्न, प्रेमजन्य लग्न, वात्स्याचें लग्न, घटस्फोटविषय लग्न यांच्या व्याख्या व प्रकार.

८ वरील लग्नातील सर्वोत्तम कोणतें?

९ लग्नाला प्रेम आवश्यक आहे काय?

१० प्रेम म्हणजे काय?

११ प्रेम चिरकालीन आहे काय?

१२ प्रेमदृष्ट्या वरील सर्वोत्तम लग्न शक्य आहे काय?

१३ प्रेम मनावर अवलंबून आहे काय?

१४ मताचा उद्भव विकारापासून होतो कीं विचारापासून?

१५ विकार प्रधान कीं विचार प्रधान?

१६ विकार बदलणारे आहेत काय?

१७ विचार बदलणारे आहेत काय?

१८ त्यातून कोणाचा पगडा कोणावर बसतो?

१९ हृदय म्हणजे काय? तें कोणाच्या राज्यात असतें?

२० सुख बुद्धिजन्य आहे की हृदयजन्य आहे?

२१ या सर्व प्रश्नांच्या उत्तरावरून प्रेमाची व्याख्या काय होते?

२२ पशुपक्ष्यात हें प्रेम आहे का?

२३ या दृष्टीनें पशुपक्ष्यांत व मनुष्यात खरेंच फरक आहे काय?

२४ असा फरक उत्पन्न करतां येईल काय?

२५ परिस्थितीच्या परीक्षेनेंच लग्न करितां येईल की नाहीं?

२६ त्याला स्थिरता आहे काय?

२७ तेंहि मोडण्याचा अधिकार पाहिजे काय?

२८ लग्न अशक्य आहे कीं नाहीं?

२९ लग्नाविषयीं वधुत्वाची अडचण आरोग्यदृष्ट्या आहे काय?

३० बंधुभगिनींचें लग्न सर्वदृष्ट्या पूर्णवस्य आहे कीं नाहीं?

३१ हें तत्त्व मान्य नसेल तर पुनर्विवाह व घटस्फोट हे प्रकार अगदीं लग्नाइतकेच आवश्यक आहेत कीं नाहीं?

३२ कोणतें लग्न शक्य, सुरस व हितकर आहे?

• • •

## 'ग्रंथावर टीका'

नि. मा. ३७९

'ग्रथावर टीका' हा लेख वाचून सुचलेले विचार—

सांपत्तिक दारिद्य मानसिक दारिद्र्यानें दूर करण्याचा प्रयत्न : विषानें विष. चांगल्या ग्रंथाना पुनरावृत्ति नाहीं. घोरपड्याची डायरी.

छापण्याची कला सुलभतेमुळें ज्ञानाऐवजीं अज्ञानाचा प्रसार करण्याकरिता हल्लीं अधिक उपयोगी पडते. अज्ञानी लोकांना सर्वज्ञतेचे धडे मिळतात.

हल्लीं प्रत्येक कवीला आपली प्रत्येक कविता वेदवाक्यासारखी वाटावी हें एका साम्यामुळें क्षम्य वाटतें.

शास्त्रीय व कलाविषयक वाङ्मय यातील दुसरेंच यूरोपीय तुलनेनें व्यवहार्य का? त्यात पाश्चात्य उच्चता गाठणें शक्य आहे म्हणून? कारण हृदयपुरत्या गोष्टींशींच त्यांत संबंध येतो कीं जें हृदय उभयतां सामान्य आहे.

३८४ पा.

टीका न होण्याचें खरें कारण शास्त्रीबुवा म्हणतात,

"विद्वानांची भाषेबद्दल उपेक्षाबुद्धीच" हल्लीं हें कारण नाहीं.

• • •

लहानपणीं कोणतीं पुस्तकें वाचावीत?

• • •

वर्तमानपत्रातील "पोंच" हें सदर ग्रंथकारापेक्षा टपालखात्याबद्दल—

• • •

मुंबई—शनिवार १३ मे १९१६

पुण्यप्रभाव ११ पदें केलीं.
सहावा अंक कोल्हटकर व गुर्जर यांना वाचून बेताचा केला.

रा ग गडकरी

मुंबई—रविवार १४ मे १९१६

दिवाईकडून बारा चाली आणिल्या
थोडा ताप आला.
विठोबा रत्नागिरीकर यांजकडून दहा/बारा आणे आले
पुण्यप्रभाव सहा पदें केली. २६ पदें फेर लिहिलीं

रा ग गडकरी

मुंबई—सोमवार मे १५, १९१६

शंकररावकडून दहा रुपये घेतले.
सगळी पदं फेर (६) लिहिलीं.
हुबळीकर, मनु, लाला यांचीं पत्रं आलीं
सकाळीं बराच ताप आला
सायंकाळीं ७ रुपयांचीं सत्रें आणलीं
रात्रौ ताप होताच

रा ग गडकरी

मंगळवार १६ मे १९१६

ती ग. भा. मातोश्री आल्या.

मुंबई, बुधवार १७ मे १९१६

ताप बराच आला.

मुंबई—गुरुवार १८ मे १९१६

सकाळीं बायरन् Child Harold मधून तिसरा canto 68 118
(म्हणजे शेवट) वाचिले.
मातोश्री व पांडुरंग पुण्यास गेलीं

मुंबई—गुरुवार १९ मे १९१६

यांनी ती. तात्यासाहेब कोल्हटकर यांचे कृपादर्शन झालें
शंकररावाकडून पाच रुपये घेतले.

• •

मुंबई—शनिवार २० मे १९१६

रा. मनोहरपंत गोळवेलकर यांची भेट झाली.
तात्याबरोबर विठ्ठलपंताकडे गेलों. त्यांची प्रकृति बरी होत आहे.
रा. दत्तोपंत देशपांडे यांनी पुण्यप्रभाव गद्याकरिता (monopoly) मागितली.

रा. ग. गडकरी

•

मुंबई, रविवार २१ मे १९१६

शीतराम परीट याकडे कपडे —
२ शॉर्ट, २ पाटरे, ७ शर्ट, १ फ्रॉक, ३ सदरे, १ जरी उपरणें, २ हातरुमाल, ७ कॉलर. (२५)
शंकरराव जोशीकृत विचित्रलीला नाटक महाराष्ट्र नाटक मंडळीनें पुढें आणिलें.
रा. माधवरावजी धुरंधर यांच्या ओळखीचा रा. अण्णा गुर्जर यांचे मध्यस्थीनें लाभ झाला.
कोरसचें पद केलें.

रा. ग. गडकरी

सोमवार, २२ मे १९१६

प्रो. वेहरे यांजकडे जेवावयास गेलों. तात्या, अण्णा, विठ्ठलपंत व मी. तात्यांनीं पुण्यप्रभाव चार अंक तालीम मी नको नको म्हणत असताही पाहिली.
चिंतामणी कोल्हटकर आजारी.
तालीम अव्यवस्थित
हिराबाईकडून दोनतीन चाली आणिल्या.
१ पद केलें.

• •

गुरुवार, २५ मे १९१६

शंकरराव मुजुमदार यांच्याकडून ५ रुपये घेतले.
दुपारीं ताप सुमारें १०४ डिग्री होता.

. . .

शुक्रवार, २६ मे १९१६

दुपारी ३ वाजता १०३।।। डिग्री ताप.

. .

शनिवार, २७ मे १९१६

१०४ डिग्री ताप.
तात्यासाहेब कोल्हटकर पुण्यास गेले.

. . .

रविवार, २८ मे १९१६

कपडे आले. २५ पैकीं २२. १ रंगीत कॉलर बाकी व २ हातरुमाल. मामाकडून नावे १ रुपया घेतला. सरबताच्या तीन बाटल्या (२।।।) घेतल्या.

१०३ ताप. देवीचा संशय खोटा ठरत आहे.

. . .

सोमवार, २९ मे १९१६

१ कोट लाव, १ कोट आल्पुड, १ शर्ट, १ ज्याकेट (४)
शीतलदास परीट
२ रु. कंपनीकडून घेतले.
ताप १०२
'सुदाम्याची मुलाखत' या लेखाची नीट कल्पना बांधली.

. . .

मंगळवार, ३० मे १९१६

ताप १०२. एक पद केलें.

. . .

बुधवार, ३१ मे १९१६

२२ तारखेपासून आजपर्यंत तालीम. कोल्हटकर आजारी; गेले तीन दिवस प्रमुख मंडळी गैरहजर.

ताप १०२
एक पद केलें.
राजसंन्यास शेवटच्या प्रवेशाचा आणखी विचार केला.

रा. ग. गडकरी

. . .

शुक्रवार, २ जून १९१६

प्रेमसंन्यासचा प्रयोग एका फोगन्याशा फंडासाठीं झाला. त्यांत लाजेनें थोशाळण्याइतका फारच मुंबईच्या प्रेक्षकांनीं सन्मान केला.

. . .

शनिवार, ३ जून १९१६

ताप फार.

. . .

रविवार, ४ जून १९१६

ताप फार.

. . .

शुक्रवार, ९ जून १९१६

चि. मंजुमाई यांची मॅट्रिकची परीक्षा पास झाली. चि. बन्या पास झाला.

सायंकाळीं ताप भरपूर.

. . .

गुरुवार, १५ जून १९१६

किर्लोस्कर संगीत मंडळीसाठीं रा. मुजुमदार यांस पुण्यप्रभाव नाटकाच्या संगीत प्रयोगाची नुसती परवानगी (not monopoly) हजार रुपये घेण्याच्या बोलीनें देण्याचें ठरवून त्याबद्दलचे उभयपक्षीं करारनामे झाले.

रा. ग. गडकरी

. . .

शुक्रवार—१६ जून १९१६

१४ तारखेस देवल वारल्याचें कळलें.
महाराष्ट्र मंडळीसाठीं पुण्यप्रभाव नाटकाची गद्यापुरती मनॉपली कि.

रु. ७५० स ठरून त्याप्रमाणें कागद करण्यासाठीं रजिष्टर कचेरींत गेलों, उशीर झाल्यामुळें कागद झाला नाहीं.

रा. वरेरकर भेटले.

रा ग गडकरी

शनिवार, १७ जून १९१६

म. ना. मंडळीचा कागद झाला दोनशें रुपये घेतले. चि मजूची तार आली. रु. ७५ माऊस्रोस तारेनें पाठविले. आठवले यास पाच रुपये दिले. वामनचा एक रुपया दिला.

. .

मंगळवार, ता. २० जून १९१६

सकाळीं ८ च्या एक्स्प्रेसनें पुण्यास जाण्यासाठीं निघालों शंकररावा कडून १३ रुपये घेतले.

शंकरराव जोशी (वसंतविहार) कवि भेटले.

चि. मजु यास ४० रुपये दिले.

२ रु. चि. पाडु यास दिले

५॥ च्या गाडीनें मुंबईसाठीं परतलों.

. .

रविवार, २५ जून १९१६

महाराष्ट्र मंडळीकडून रु. ५० मिळाले. ताप बराच आला.

सोमवार, २६ जून १९१६

रा. वरेरकर यास ३५ रु दिले

.

शनिवार, ता १ जुलै १९१६

पुण्यप्रभाव पहिला प्रयोग—रिपन थियेटर–कामें विनोदी फारच छान बाळकृष्णानें कल्पनेबाहेर काम केलें मिरजकर फारच छान वसुंधरा, कालिंदी व भूपाल अगदीं भिकार. नाटक रंगलें नाहीं.

रविवार, ता. २ जुलै १९१६

पुण्यप्रभाव दुसरा प्रयोग. गरदी बरीच. विनोद छान कळला. serious भाग साधारण. मार्च्ची कामे आज्ही वाईट झाली.

. . .

गुरुवार, ता. ७ जुलै १९१६

कंकणाचा नवीन प्रवेश लिहिला.

. . .

शनिवार, ता. ८ जुलै १९१६

पुण्यप्रभाव. पावसामुळें गरदी कमी.
खेळ साधारण वठला.

. . .

रविवार, ता. ९ जुलै १९१६

पुण्यप्रभाव. पाऊस फार, गरदी बेताची. कोल्हापूरे यांनी काम चांगलेंच केलें; विनायकांतही सुधारणा दिसली. त्यामुळें खेळ चांगला वठला. चाली चांगल्या नाहींत.

. .

सोमवार, ता. १० जुलै १९१६

रा खरे म्हणाले, भेटण्याचा हेतु नाटकावर टीका हा होता, नूपुर व कंकण हे अनुक्रमें नेमस्त व जहाल यांची चित्र आहेत ही त्यांची विक्षिप्त कल्पना ऐकून मनाला जितकें आश्चर्य वाटलें तितकेंच वाईटही वाटलं, अशा मळल्याच कल्पना मनावर कोणी लादणें हें नित्य आहे.

रा ग गडकरी

.

शनिवार, ता. १५ जुलै १९१६

पुण्यप्रभाव. गरदी पावसाच्या मानानें चांगली. appreciation फारच dirty छान dispirited audiance अगदींच गचाळ. उत्पन्न साधारण. काम (serious) साधारण.

रा ग. गडकरी

रविवार, ता १६ जुलै १९१६

गर्दी छान, उत्पन्न छान, appreciation फारच छान, कृष्णा व

मटरमकर यानीं कामें बरींच चांगलीं केली, प्रथम अशीं कामें केली असतीं तर इतका खेळ पडला नसता. शंकररावानीं चूक करून घाईनें तानेवक्श रविवारीं लावला. थोड्या पैशासाठीं एक खेळ बुडविण्यापायीं ही अवदशा आहे.

• •

गुरुवार, ता. २० जुलै १९१६

Fever फार.

शनि नडल्ला. कोणाच ठाऊक कच्यासाठीं कीं चांईटासाठीं ? कर्मण्ये वाधिकारस्ते ! कांहीं यांर्ट न करिता संशयग्रस्ततामुळें या नसत्या चिंता. गुर्नेर माझ्या सुपरस्टिशनला हसतात. अण्णा सरळ आहेत. बंधुप्रेमामुळें त्याचा अधिकार हा आहेच, त्यातून वडील बंधुसारखे, मीच वेडा ठरणें बरें.

रा ग गडकरी

•

शुक्रवार, ता. २१ जुलै १९१६

Fever फारच ज्यास्त काल दिवसभर motions रात्रींही तोच उपक्रम. आज दिवसभर Constipation चित्त फार विचारे अण्णा रात्रीं सुद्धा तब्येत पाहण्यासाठीं आले हें निव्याज बंधुप्रेम ! इतकें प्रेम आज फार दिवसांनीं अनुभविलें

रा ग गडकरी

शनिवार, ता. २२ जुलै १९१६

टेल्याची मरमराट टीका इंदूत आली अण्णा रागावले अण्णाच्या समाधानासाठीं आता जगानेंच मला बरें म्हणायला हवें ! प्रेम वेडें आहे ! काल परवा हि शीं सुद्धा तटा करून अण्णा मोकळे झाले !

वसंतराव N Dr बद्दल बोलले !

चतुरार्ईकडे तिकिटें दिलीं

नाटकाला गर्दी अगदीं वेळेवर फार जमली खेळ आता failure खास नाहीं श्री. भाऊसाहेब वहिनीसाहेबासह नाटकास आले

रा ग गडकरी

• •

रविवार, ता. २३ जुलै १९१६

चि. लली ईस देवाज्ञा झाली. बिचाऱ्या नानावर अकालीं हा दुःखाचा कडा कोसळला. नानाची हिंमत खचताना उभ्या जन्मात मीं आजच पाहिलें ! त्याच्या जीविताबद्दल मला आज अविश्वास वाटला. म्हाताऱ्याला देव आयुष्य देवो. बिचाऱ्या ललीला १० वर्षांपूर्वी याच शहरीं हाता-खांद्यावर खेळवून आज तिला खांद्यावर वाहून नेली ! ईश्वरेच्छा बलीयसी !

चमत्कार : सकाळीं ५॥ चे सुमारास ललीच्या मरणाचेंच मला बरोबर स्वप्न पडलें !

रा. ग. गडकरी

. . .

बुधवार, ता. २६ जुलै १९१६

डॉक्टर मिस् नागूताई जोशी यांच्याशीं परिचय झाला.

. . .

शनिवार, ता. ५ ऑगस्ट १९१६

नारायण घोरपडे व गायकवाड आले; होऊ नये तें झालें. उभ्या जन्माची अब्रू मुंबईकर प्रेक्षकांसमोर त्यांच्या दृष्टीनें बाहेर पडली; I am a drunkard that has been more than proved

R G G

. .

रविवार, ता. ६ ऑगस्ट १९१६

Mr S B Mujumdar proved to be more than a father, my Bel—more than a son

R G G

. . .

शुक्रवार, ता १८ ऑगस्ट १९१६

पुण्यप्रभाव at Poona grandest possible success. Poona public could appreciate my play to its utmost

R G G

गुरुवार, ता. २८ सप्टेंबर १९१६

Presented a watch (40 Rs) to कोल्हटकर through Mr vincent, the Police Sup of Bombay.

. . .

# राम गणेश गडकरी यांनी लिहिलेलीं पत्रें

गणेश गोविंद बोडस

शकर बापूजी मुजुमदार

चिंतामणि द्वारकानाथ देशमुख

तुकोजीराव महाराज, देवास

गोविंद सदाशिव टेंबे

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

एक गुजराती स्नेही

पाडुरग बळवत बापट

विठ्ठल सीताराम गुर्जर

शंकर गणेश गडकरी

## गणेश गोविंद बोडस

श्री

खामगाव, १०।११।०८

सा न वि वि

पत्नीस प्रेमळ बंधूंचा सहवास सोडून एकदम अपरिचित मंडळींत दाखल झाल्यामुळें मनाला काय दुःख भोगावें लागतें याचा हल्लीं चांगला अभ्यास चालला आहे तीन वर्षें इतकें सुख दिल्यानंतर किर्लोस्कर मंडळी पुढें मला इतकें दुःख देणार आहे हें मला पूर्वींच कळतें तर मी प्रथमच मंडळींत आलों नसतों आपण सर्व एकमतानें थट्टा कराल हें जाणून आहें तरी इतकें लिहिल्याखेरीज राहावत नाहीं घरून निघाल्यापासून कल्याणपर्यंत मी सारखा अश्रूंच रडत होतों व हल्लींही दोन दिवस मधूनमधून तोच उपक्रम चालू आहे बाळापुराहून ताबडतोब येथें येऊन तात्यासाहेबांस भेटण्याची बुद्धि झाली नसती तर हे दिवस तरी कसे गेले असते याची कल्पना करवत नाहीं सदासर्वदा कोट्या करीत बसणारा मी सध्या या दोन दिवसांतच एक चांगला पोक्त व विचारी म्हातारा झालों आहें बाळापूर म्हणजे एक दृष्टमणी म्हणविण्याजोगें गांव आहे लोकवस्ती, राहणी, सोई वगैरे सर्व बाबतींत तें वनवासाला खात्रीनें मागें टाकील लो टिळकांना सहा वर्षें काळेपाण्यावर पाठविण्याच्या भानगडींत सरकार कां पडलें हें कळत नाहीं बाळापुरच्या शाळेंत त्यांना मास्तरकी करायला लावून त्यांची खोड सहज मोडतां आली असती ! असो हा हल्लींच्या विचारसरणीचा एक मासला आहे उद्यां गाडीनें कंपनींत येऊन बसणें हें खरोखरीच पोरक्यांचें नसतें तर मी तें करायलाही चुकलों नसतों आपल्या मंडळीला सोडून राहणें फार कठिण आहे मंडळी मला कंटाळली होती पण मला ती हवीशीच आहे असो हेही दिवस काढणें भाग आहे विशेष मजकूर पुढील पत्रीं कळवीन पत्राचें उत्तर यावें अशी आशा आहे क लो अ

आपला
दुःखित बंधु

पत्ता
C/o V G Gadkari
Sita Bardi
Nagpur

श्री.

नागपूर, २५।११।०८

सप्रेम साष्टांग नमस्कार वि. वि.

आपलें पत्र परवाच मिळालें; वाचून आनंद झाला! पत्त्यावरील 'वेडेंवाकडें' इंग्रजी पाहून व वाचून घटकाभर करमणूक तर झालीच, पण पत्रातील मोडी वाचताना घटकाभर अडचणूकहि झाली! माझें मोडीचें ज्ञान आपण जाणताच कवितानंद पत्रात "नटवेगिरी"चा उल्लेख करण्यात शब्दयोजनेपेक्षा विनोदाकडे विशेष लक्ष्य होतें हें आपल्या लक्ष्यात आलें नाहींसें आपल्या पत्रावरून दिसतें! रा. कुलकर्णी याचें नाटक कोठवर आलें? तसेंच "दामिनी" नाटकाचें काय झालें? माझें प्रल्हादचरित बहुतेक आटोपत आलें आहे. इतक्या अवधींत आटोपलेंहि असतें. पण कांहीं अनिवार्य कारणामुळें सविधानकात बराच फेरफार करून तीन अंकाचे पाच अंक करावे लागले! सध्या रोज नाटकच लिहित असतों. थोडा उशीर लागला तरी हरकत नाहीं परंतु त्यात फारसे दोष राहू नयेत अशी माझी इच्छा आहे. बहुतकरून डिसेंबर दहा तारखेच्या सुमारास मी नाटक पाठवून देईन किंवा स्वत घेऊन येईन! आटोपशीर प्रवेश कसे लिहावेत हेंच अजून कळत नाहीं, त्यामुळें अतिशय त्रास होतो. "रंगभूमी"साठीं थोडें लिहिलें आहे; आणखी लिहीन म्हणतों, पण या नाटकानें डोकें अगदीं भडावून सोडलें आहे! तें आता जितकें लौकर आटोपेल तितकें बरें असें मलाही वाटू लागलें आहे! असो. अजून मी नोकरीचें ठरविलें नाहीं. चारपाच ठिकाणीं प्रयत्न करीत आहें; जमल्यास पहावें! मि. मि. पांडव याना पत्र लिहिताच येत नाहीं कीं काय? उत्तर वेळेवर येत नाहीं! नवीन मास्तराचें नावगाव शेवटीं कळवलें नाहीं तें नाहींच! पुढील खेपेस 'पांडुरंग महात्म' हें ——— काव्य पाठवीन. आपल्या छत्रपतींचंच ——— त्यात आहे. येथें थंडी भयंकर आहे; तीमुळें प्रकृतीही असावी तशी नाहीं. मि. मि. राजाराम याजकडूनहि पत्राचें उत्तर नाहीं! कदाचित् कार्यबाहुल्यामुळें असें होत असेल! पत्रानून परस्परास शिव्या देणें हें जर शिष्टाचारास सोडून नसतें तर मि. पाडोबा, राजामाऊ वगैरे मंडळींना आगस्ती एक एक पत्र मी पाठविलें असतें. ती. रा. रा. शंकररावजी आमच्याबर बरेच रागावल्यासारखे दिसतात! नाट्यकलेचे प्रदर्शनांत खेळ होत असतात. तुमच्या स्वार्‍याचें काय जमल्यास कळविणें!

आज एक शिकवणी आली आहे! मॅट्रिकमधील एका मुलास एक तासभर शिकवायचें आहे! पहावें काय होतें तें! रात्रौ आमचा मुक्काम रा. भाऊ साहेब भिडे यांचेकडे असतो. पत्राचें उत्तर यावें कळावें लोभाची वृद्धि असावी ही विनति. मुलांस आशीर्वाद, इतरांस नमस्कार.

आपला
राम गणेश गडकरी

रा गणेश गोविंद बोडस
किर्लोस्कर संगीत मंडळी, ग्रँटरोड पोस्ट, मुंबई

## शंकर बापूजी मुजुमदार

१९।६।०९

सा. न वि. वि

सामानासंबंधीं आपण केलेल्या निरवानिरवीबद्दल आपला मनापासून आभारी आहे. त्याचप्रमाणें बहुशाही टाकून दिल्या असत्या म्हणजे उपकृति पूर्ण झाली असती त्यांचा आपणास कांहीं उपयोग नाहीं हें उघड आहे मला माझ्या करमणुकीसाठीं तरी त्याची जरुरी आहे खास शिवाय अप्रिय मनुष्याची स्मृति करून देणाऱ्या या क्षुल्लक वस्तु मनाला तिरस्कारजन्य त्रास देण्यास कारणीभूत होतात हा सार्वत्रिक अनुभव आहे यांप्रमाणें दोन्ही बाजूंनीं हितावह न होणाऱ्या या पदार्थांची त्याच्या मालकाप्रमाणेंच योग्य बोळवण करणेंच आपणास इष्ट वाटत नाहीं काय? वि बाबूस मुद्दाम पाठविलें आहे पुन पुन माझ्या अप्रत्यक्ष दर्शनानें आपणास राग येणार हें खास, तथापि तोडून टाकलेलें पालीचें शेपूट कांहीं वेळ हालत असतें या निसर्गनियमाकडे लक्ष्य देऊन आपण माझ्या पुरस्सरतेची एकवार क्षमा करालच अशी आशा आहे कळावें लोभ असावा ही विनति

आपला
गडकरी

## शंकर बापूजी मुजुमदार

वर्धा, २५-३-१९१०

स. न. वि. वि.

जोगळेकर यांनीं आपणाकडून आलेल्या पत्रांतील मजकूर कळविला. माझी मंडळींतून निघण्याची इच्छा तात्पुरती नसून कायम दाखल असल्यामुळें आपल्या गैरहजेरींत जाणें निदान मला तरी—उत्कट इच्छा असूनही—इष्ट दिसत नाहीं. यामुळें मी पुढीलप्रमाणें विचार केला आहे: आज राहिलेलीं दोनतीन पदें केल्यावर नाटकाचें नवीन लिहावयाचें असें कांहीं रहात नाहीं. यानंतर सोमवारीं आपण आल्यावर सुधारणांबद्दल व फेरफाराबद्दल एकदांचें कायम ठरवून नंतर मंगळवारीं अथवा बुधवारीं मी आपली रजा घेईन. म्हणजे पुन्हा या उभयपक्षीं कंटाळवाण्या वाटणाऱ्या विषयाबद्दल—माझ्या नाटकाबद्दल कांहींच बोलण्याचें कारण नाहीं. आज उद्यां मी तेथें गेलों असतां कदाचित् कांहीं फेरफार करण्यासाठीं मला पुन्हा यावें लागण्याचा संभव आहे. एकदां सर्व विचार करून नाटकाबद्दलच्या सर्व भानगडी यथासांग झाल्या म्हणजे वरप्रमाणें होण्याचा संभव उरणार नाहीं. आपणास माझें हें म्हणणें पसंत पडेल असें वाटतें आणि यावरून आपली जवळपास परवानगी मिळूनही आपण येईपर्यंत मागला पाय मी कां घेत आहें याचें कारण आपल्या लक्षांत येईलच. प्रस्तुत पत्र पाठविल्याबद्दल मनःपूर्वक माफी मागतों. कारण अनपेक्षित गोष्टींच्या दर्शनानें मनाला त्रास होणें स्वाभाविक आहे. कळावें, लोभ असावा ही विनंति

आपला
कृपाभिलाषी
गडकरी

## शंकर बापूजी मुजुमदार

पुणें, १७।३।१२

स. न. वि. वि.

आपलें ममत्वपूर्वक लिहिलेलें पत्र वाचून फारच आनंद झाला. आपण कळविलेल्या सुधारणांबद्दल मी आपला आभारी आहें. नाटक उत्तरोत्तर

अधिक अधिक चांगले वटत जाऊन लोकप्रिय होत चाललें आहे असे आता साधारणपणें म्हणावयास हरकत नाहीं. नाटक रंगभूमीवर आल्या मुळें वाटणाऱ्या आनंदाला तोडून धरावयास लागणारा टीकाचा भाग ही जोम दार प्रमाणावर होत आहे हें इंदुप्रकाश, ज्ञानप्रकाश, मुंबई वृत्त, इंडियन सोशल रिफॉर्मर वगैरे पत्रांवरून आपल्या निदर्शनास आलेंच असेल. या तीस दिवसांच्या अवधींत लहानमोठ्या पंधरा टीका झाल्या आहेत. हा एकताड ताप आणखी बरेच दिवस चालेल असा बळकट अदाज आहे. हें नुसत्या मुंबईपुरतें झालें. ता. २३ व २४ रोजीं, मंडळी पंढरपुरास जाताना, बार्शेत मंडळी दोन प्रयोग करणार आहेत. त्यावेळीं पुणेकराकडून शेलापागोटे मिळेल तें तर अल्लाहिदाच! ! शारीरिक आजारात प्रथम हिंव भरून नंतर ताप येतो. पण या एकताड तापाच्या नंतर हिंव भरले हा विशेष लक्षात ठेवण्यासारखा आहे. याशिवाय खाजगी पत्रांनीं व तोंडी कितीतरी परींनीं माझे इष्टमित्र सुधारणाच्या सूचना सारखे करीत आहेत. चार सहा दिवसातच मी नाटकात बऱ्याच सुधारणा करणार आहें. त्यायोगें नाटक विशेष लोकप्रिय होईल अशी खात्री वाटते. सुधारणाचें स्वरूप कोणत्या प्रकारचं आहे हें एकदोन दिवसातच 'इंदू'च्या अंकावरून आपणास कळेल. सुधारणा केल्यावर लौकरच पुस्तक छापावयास घेणार आहे पुस्तक कोल्हटकराना अर्पण करणार आहें हें सागणें नकोच

आता आपल्याविषयीं! आपण संस्थेच्या मालकापैकीं एक झाला आहा हें सागोवागीं कानावर येऊन मनस्वी आनंद झाला. त्याबद्दल मी आपल्या तिघाही मालकाचें अभिनंदन करतों कै. जोगळेकर माझें नाटक पहावयास आज मितीस ह्यात नाहींत हें मी माझें दुर्दैव समजतों मी हल्लीं कॉलेजमधें जात असतों, हें आपण जाणताच. माझी प्रकृति मात्र अलीकडे फारच वाईट होत चालली आहे. दम्याचा विकार प्रबळत्वानें जडला आहे औषधो पचार चालू आहेत.

रा. पेठे सेक्रेटरी झाल्याबद्दल त्याचही मनापासून अभिनंदन करतों

मंडळींत नवीन आलेले नट कितपत कामें करू लागले आहेत तें कळवावें. आपण इकडे येण्यापूर्वी दोनतीन नवीन नाटकें बसवल्यास फार उत्तम होणार आहे. म्हणजे नवीन नटाकडे तुलनात्मक दृष्टया पहावयाची लोकदृष्टीस फारशी संधि मिळणार नाहीं. रा खाडीलकर हे विद्याहरण लिहीत आहेतच. त्याचप्रमाणें रा आजगावकराचें 'हरिश्चंद्र' नाटक मंडळीच्या सुपूर्द आहेच, तें बसवावयास घेतलें असता उत्तम होईल अवश्य त्या सुधारणा रा. आजगावकराकडून करून घेतल्या म्हणजे झालें. स्वता मला तें

नाटक मन्यापैकीं वाटतें. जुन्या नाटकापेक्षां नवीन मंडळीच्या हल्लीच्या स्थितीच्या दृष्टीनें किती जास्त उपयोगी आहे हें पुन्हां सांगण्याची आवश्यकता नाहीं. हें माझें म्हणणें रा. रा. रा. नानांस मुद्दाम सांगणें व त्यांचे तद्विषयक उत्तरही मला कळविणें. रा. खाडिलकरांचें नाटक पुढें आल्यानें मला विशेष आनंद होणार आहे.

पुण्याचा प्लेग अजून अजिबात कमी झाला नाहीं. निपाणीहून मंडळी पुढें कधीं जाणार आहे तें ... ... ... ...

सर्व लहानथोर मंडळीस अधिकारपरत्वें सप्रेम आशिर्वाद व नमस्कार सांगणें. पत्राचें उत्तर द्यावें. कळावें लोभ............

पत्ता:—राम गणेश गडकरी,
कसबा पेठ, पुणें

आपला
गडकरी मास्तर

## चिंतामणि द्वारकानाथ देशमुख

Dear Master Deshmukha,

Allow me, a perfect strenger, to send these few lines to you. The lines will speak for themselves. I am too much of a cosmopolitan to look at things from a sectarian point of view. The exceptional occasions are very rare and I am glad to say that the present one is the most conspicuous of them; at least in my reckoning. Excuse me if I am intruding. The poets are mad, they say; and with your sweet permission, I shall audaciously enough, no doubt, call myself one, to take advantage of the privileges of the lunatic fraternity. Shall I make myself so bold as to hope to see you, if, one of those days, you happen to come down to Bombay. I am extremely sorry if I have offended you least ways with these few words.

Yours friendly
"Govindagraja"
(or, if you care to know)
Ram Ganesh Gadkari

[पत्रावर तारीख नाहीं. —संपादक]

## तुकोजीराव महाराज, देवास

श्री

अथणी
किर्लोस्कर संगीत मंडळी
३ जानेवारी १९१४

श्रीमत महाराज क्षत्रीय कुलावतंस सेनापति श्री तुकोजीराव बापूसाहेब महाराज, के. सी. एस. आय., संस्थान देवास थोरली पाती यांच्या परमपूज्य चरणीं शतशः प्रणिपातपूर्वक सेवेशीं सादर :

कोल्हापूरचे मे. रा. रा. भास्करराव‌जी जाधवराव यांचे सूचनेबरहुकूम माझ्या प्रेमसंन्यास नाटकाचीं पुस्तकें श्रीमत सरकार स्वारीच्या परमपूज्य चरणीं सेवेसाठीं अत्यंत नम्रतापूर्वक सादर केलीं आहेत. या अत्यल्प सेवेचा कृपापूर्वक स्वीकार होईल अशी नम्र आशा आहे. सरकार स्वारींच्या चरणाचा परिचय नसताना, ही सेवा करण्यांत अजाणपणानें मजकडून मर्यादेचें अतिक्रमण झालें असल्यास त्याबद्दल श्रीमंत सरकारस्वारींकडून क्षमा व्हावी अशी साष्टांग प्रणिपातपूर्वक याचना आहे. या पुस्तकांतील अनेक दोषांबद्दलही मी श्रीमत सरकारस्वारींच्या चरणाजवळ आधींच क्षमा मागतो. हें पुस्तक वाचून सरकारस्वारीला अत्यल्प संतोष जरी झाला तरी मी माझ्या लेखन श्रमाचें सार्थक झालें असें मानीन.

श्रीमत सरकारस्वारींच्या चरणाचे दर्शनाचा सुयोग घडून येईल तो दिवस मी महत्तम भाग्याचा समजेन.

श्रीमत सरकारस्वारींची या नम्र सेवकावर सदैव कृपादृष्टि असावी ही श्रीमत सरकारस्वारींच्या पायाजवळ अत्यंत नम्रतेची व अनेक प्रणिपात पूर्वक विनंति सादर होय.

श्रीमत सरकारच्या चरणाचा
अत्यंत नम्र सेवक
**राम गणेश गडकरी**

## गोविंद सदाशिव टेंबे
## गणेश गोविंद बोडस

श्री

स. सा. न. वि. वि.

आपणा उभयताची एकदम भेट घेणें आहे; तरी, कोणत्या वेळीं आपण दोघेही (रा. टेंबे व आपण–रा. बोडस किंवा आपण) मडळींत असाल तें उत्तरीं कळविण्याची कृपा व्हावी. आपणा दोघासही मजकडे येण्याची सवड होण्यासारखी असल्यास फारच उत्तम होईल. त्याचाही खुलासा व्हावा. कळावें.

६-७ १४
१३६ कसबा

आपला नम्र बधु
रा. ग. गडकरी

रा. बोडस किंवा टेंबे यास ग. ना. मडळी
स्थानिक

[Pray come at once. We are both of us to be found here.

Yours
G. S. Tembe

हें उत्तर त्याच पत्रावर आलेलें आहे—संपादक]

## श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

श्री.

३१ जुलै १९१४
१३६ कसबा पेठ, पुणें

स. सा. न. वि. वि.

आपलें रजिष्टर बुकपोष्ट (वधूपरीक्षा, २ पुस्तकें) पावलें. पुस्तकाचें बहिरंग इतकें सुंदर साधलें आहे की प्रथम हें एकादें इग्रजी पुस्तक आहे असा भास होतो. आजवर आपल्या नाटकातलीं इग्रजी वळणाविचाराचीं वाक्यें वाचतानाच काय तो असा ग्रह होत असे. वधूपरीक्षेच्या बाबतींत बहिरंगापासूनच या ग्रहाचा जन्म होतो. आभाराच्या यादींत माझें नाव पहाण्यात आलें; "नाटक चमत्कृतिपूर्ण असलें पाहिजे" या आपल्या लाडक्या तत्त्वाच्या दिग्दर्शनाची प्रस्तावनेपासूनच सुरवात केल्यासारखी दिसते. कार्यकारणभावविषयक तटस्थ वृत्तीच्या या चमत्कृतीच्या लाभाला

आपले मजव्यातिरिक्त वाचक मुकले आहेत हें त्याचें दुर्दैव होय त्याना या चमत्काराचें अज्ञानामुळें कौतुक करिता येणार नाहीं स्वत मला मात्र, आता आपल्या हातून वकील या नात्यानें झालेल्या एखाद्या दस्तऐवजात साक्षीदाराच्या पंक्तींत माझ्या नावाची भरती झालेली पाहून सुद्धा आश्चर्य वाटणार नाहीं. प्रस्तुत पुस्तकात मी आपणाला कोणतें साह्य केलें तें मला माझ्या पूर्वजन्मींच्या संचितादतकेंच अज्ञात आहे. या आपल्या विनोदपूर्ण चमत्कारापुढ नाटकातील सारे चमत्कार निरुपयोगिपणाइतकेच साधे वाटल्यावाचून राहणार नाहींत.

माझें नाटक बहुतेक सपत आलें आहे. लौकरच तें गधर्व मडळीकडे पाठविण्याचा इरादा आहे

तूर्त येथ कॉलऱ्याचा उपद्रव फार जोरानें सुरू आहे पाऊस तर आज महिनाभर सारख्या नेटानें पडत आहे. प्लेगच्याही दोनचार केसीस झाल्याचें ऐकू येत या परिस्थित नासामुळें तूर्त लेखनाकडे मुळींच लक्ष लागेनासें झालें आहे

आपल्या सर्व मुलास माझा सप्रेम आशीर्वाद सागणें. ती सौ वहिनी साहेब यास माझा सादर नमस्कार सागणें

पत्राचें उत्तर यावें कळावें लोभाची वृद्धि असावी ही विनती

आपला कृपाकांक्षित
**राम गणेश गडकरी**

## एक गुजराती स्नेही

Dear Sir,

This morning I have received your letter as well as a copy of राईनो पर्वत, which you had been kind enough to send to me I have read it with great pleasure and I think it can be translated in Marathi Please kindly introduce me, of course through a letter to Ramanbhai himself, as it is quite necessary to have a direct correspondance with the author to settle a few points re the translation Simply inform him that I am about to write to him directly in a week or so Hoping to hear from you as soon as possible

17 8 14 — yours friendly
136 Kasaba Peth — R G Gadkari
Pona City

## पांडुरंग बळवंत बापट

श्री.

मुंबई
१५।४।१५

अनेक आशीर्वाद विशेष.

तुझीं दोन्हीं तिन्हीं पत्रें पोंचलीं. माझी प्रकृति सध्यां फारच चांगली आहे. इतके दिवस नाटक लिहिण्यासंबंधीं जो तंटाबखेडा चालला होता तो काल रोजीं साफ मिटून नाटक लिहावयाचें ठरलें. मी वह्या नेण्यासाठीं उद्यां परवां येईन. तूर्त येथेंच लिहावयास सुरवात केली आहे. मी तेथें येतांच तुझ्या फीची व्यवस्था करितों. नाटकाचें कांहींच निश्चित न ठरल्यामुळें आतांपर्यंत मी फार फिकिरींत होतों. चि. मंजू यांस आशीर्वाद. रा. भाऊ सा., रा. भालचंद्र यांस सप्रेम नमस्कार. चि. जगूस आशीर्वाद. ती. गं. भा. मातोश्रीस सा. न.

आपला
**मास्तर**
**गडकरी**

रा. गंगाधरपंत व चि. बन्या यांस भेटून मी उद्यांला येणार आहे हें कळविणें. बहुधा उद्यांच निघेन.

चि. पांडुरंग बळवंत बापट
C/o राम गणेश गडकरी,
१३६ कसबा पेठ, पुणें शहर

## विठ्ठल सीताराम गुर्जर

श्री

१३६ कसबा, पुणें
१६।९।१५

स. सा. न. वि. वि.

इतके दिवसांत आपणांस पत्र पाठविलें नाहीं याबद्दल क्षमा करा. मी गेले दोन—फारच आजारी होतों. पुण्यप्रभाव नाटक तीन दोन महिन्याखालीं लिहून झालें आहे. आपणांस वाचण्याकरिता पाठविणें हें माझें कर्तव्य होतें. परंतु फेर—मुळें पाठविता आलें नाहीं. नाटक—वाटाघाटी होऊन अखेर गंधर्व नाटक मंडळीस देण्याचें ठरविलें आहे, पदें अजून झालेलीं नाहींत. नाटक बाहेर पडण्यास पाचसहा महिने लागतीलसें वाटतें.

घेट हेविियर व एल्फिन्स्टन यांच्यातील शील्ड सेमी फायनल मॅच कधीं होणार आहे हें उत्तर टपाली कळविण्याची तसदी घ्यावी. मी मॅच पाहावयास येणार आहें.

ती. रा. देवळ मास्तर तूर्त येथें आहेत.

ती. रा. तात्यासाहेब यास पत्र पाठविलें नाही व त्याचे कडूनही पत्र आलें नाहीं, तरी त्याचेकडील कुशल कळविणें.

माझ्या प्रहसनाच्या पुस्तकांपैकीं दोन पुस्तकें आपणाबरोबर आहेत कीं काय याचा खुलासा करणे.

रा. मित्र याना सांगून रा. रमणिकराम गोवर्धनराम याजकडून "सरस्वतीचंद्र" भाग १।४ पाठविल्यास फार मेहेरबानगी होईल.

"कवींचा कारखाना" व चारपाच लहान कविता लौकरच पाठवितों.

पत्राचें उत्तर यावें. कळावें लो---

आपला नम्र बंधु
**राम गणेश गडकरी**

## शंकर गणेश गडकरी

श्री

चि. रा. मनुवाळ यास अनेक आशीर्वाद विशेष---

चि. बाबुराव परवाचे दिवशीं मुंबईस ती. रा. दादाकडे गेले आहेत. कारण ती. सौ. मामीसाहेब तूर्त तेथें असून त्याची प्रकृति अतिशय अस्वस्थ असल्याचें त्याचेकडून सांगून आलें होतें सध्या प्रकृति बरी आहे; चि. बाबू उद्या परवा येथें येईल. मी, नानामामा, चि. दत्तू व ती. ताई वगैरे मंडळी आपले घरातच असतों. आम्हा सर्वांची प्रकृति उत्तम आहे. कांहीं एक काळजी नसावी. आज रोजीं ती. बाबुल्भाई यास तार १०० रुपयाकरितां पाठविली आहे. मला पुढच्या आठवड्यापर्यंत पैसे मिळणें शक्य नाहीं. पुढच्या आठवड्यात त्याचे पैसे परत करिता येतील त्याचे कडून न आल्यास माझी फार फसगत होणार आहे. मी दिवाळीकरिता सासनेरास येणार आहे. ती. ग. मा. मातोश्रीस इकडे येऊ देऊ नये, त्या आल्यास माझी फार अडचण होणार आहे. शपथ घालून त्यास तेथेंच राहवून घेणें. मी अगदीं खुशाल आहें. माझी मुळींच अडचण करू नये. पुढच्या आठवड्यात मी येऊन जाणार आहे. येथें प्लेग वाढत आहे. तथापि कांहीं काळजी

नसावी. Reply कार्ड आपण मजकडे पत्ता लिहून पाठविलें आहे.

आमच्या प्रकृतीची काहीं एक काळजी करू नये. आम्ही अगदीं खुशाल आहों.

रा. ग. गडकरी

रा. रा. शंकर गणेश गडकरी
C/o गडकरी वकील यांचे घरी देणें—
पो—सावनेर, जि—नागपूर

[पत्रावर केवळ सावनेरचेच पोस्टाचे शिक्के आहेत. शिक्क्यावरील तारीख : ३० सप्टेंबर १९१६—संपादक]

## विठ्ठल सीताराम गुर्जर

श्री

पुणे शहर
९।७।१७

रा. सा. न. वि. वि.

आपलें पत्र पोंचलें. आपणाकडे पाठविलेल्या नाटकाच्या हस्तलिखितात कमी करण्याचा शक्य तितका मजकूर कमी करूनच पाठविलेला आहे. पुढील दोन अंकात मात्र बराच भाग गाळता येण्यासारखा आहे; आणि इतक्यावरही फॉर्म वाढलेच तर अपुऱ्या स्वल्पात नाटक छापण्यापेक्षा, ज्यादा छपाईचा खर्चच मजवर आलेला बरा असे मला वाटतें. तरी आपण नाटक मनात संकोच न बाळगता छापावयास घेणें. ज्यादा खर्च येईल तो भरण्याची माझी तयारी मनःपूर्वक आहे. मी शक्य तितकें नाटक लहान करण्याचा प्रयत्न करीनच. ज्यादा खर्चासाठी रा. पुरंदरे याजजवळ आपले रकमेपैकीं दोनशें रुपये अमानत राहणारच आहेत. अदाजें किती फॉर्म (पाठविलेल्या मजकुराचे) होतात तें कळविण्याची कृपा व्हावी. प्रुफें मजकडे पाठविण्याची अवश्य तसदी घ्यावी पाठविलेल्या मजकुरात बहुतेक कमी करण्यासारखें नाहीं. सहाव्या अंकात मात्र बराचसा पाल्हाळ कमी करता येईल. पाचवा अंक लहानच आहे. 'अग्निदिव्या'चा उगाच लांबलेला प्रवेश अजिबाद कमी करणार आहें. अगाऊ रकमेपैकीं राहिलेले पन्नास रुपये उद्याच्या उद्या अगदीं तारेनेंच पाठविल्यास फार उत्तम होणार आहे. कारण मला पैशाची निकड धमालीची आहे. शक्य असल्यास तूर्त आपणाजवळचे पन्नास रुपये

उद्या मला पाठवून पधरा तारखेस आपण रा. पुरदन्याकडून घ्यावेत. ज्यादा छपाईबद्दल आपण अगदीं निर्धास्त असावें. तो खर्च सोसण्यास मी केव्हांही तयार आहें. सर्वांस आशीर्वाद व नमस्कार. पत्राचें उत्तर यावें. आपणास पडणाऱ्या तसदीबद्दल मन पूर्वक क्षमा करावी. कळावें लोभ असावा ही विनंती.

आपला,
नम्र बंधु
**मास्तर**

## विठ्ठल सीताराम गुर्जर

श्री

पुणें शहर
ता १५।८।१७

रा. सा. न. वि. वि.

आपलें कृपापत्र पोंचलें. वाचून सखेदाश्चर्य वाटलें. आपलें नाटक पोंचलें येत्या शनिवारपर्यंत रा. टेंबे हे त्यांचें नवीन नाटक 'कृष्णकांचन' हें पुन्हा नीटपणें रंगभूमीवर आणण्याच्या खटपटींत असलेमुळें त्यास सध्यां मुळींच वेळ नाही, त्या नाटकाचे कर्ते येथें आले असून नाटकाच्या तालमी जारीनें सुरु आहेत. त्यामुळें आपलें नाटक त्यास पुढील आठवड्यांत वाचून दाखविण्याचें ठरलें आहे. प्रुफ काल पाठविलीं. चवथ्या अंकाचीं हस्तलिखित पानें किती आहेत किंवा चवथ्या अंकापर्यंत छापील पानें किती होतील हें अदाजें तावडतोब कळविण्याची कृपा व्हावी, त्या मानानें पुढें कापावयाचें आहे, आज पांचवा अंक कापून तयार केला आहे; उद्या रवाना करतों बहुतेक मजकूर वाढणार नाहीं असें वाटतें. नाटकाचे फोटोबद्दल मला रा शंकररावाजवळ सांगता येणार नाहीं हें आपणास आधींच सांगितलेलें होतें; व फोटो त्यांज कडून काढवून घेण्याचें आपण आपल्याकडे घेतलें होतें रा टेंबे बहुधा फोटो देतील, परन्तु फुकट मात्र मिळणार नाहींत. फोटोग्राफर त्याचाच मनुष्य असे त्यामुळें शक्य तितका कमी चार्ज मात्र होईल असें वाटतें. आपण सांगत असल्यास मी त्यास विचारतों. पुण्यप्रभाव त्याचें कंपनीस दिलें आहे. तालमी पुढील आठवड्यांतून होतील. हल्लीं मी घरगुती कामांत बराच गुतलों आहें. शिवाय प्रकृतीही नीट नाहीं. आपल्या प्रहसनासंबधीं गंधर्वाचें व

आपलें जमत नसल्याचें कळतें. आपण सविस्तर हकिकत कळवाल अशी आशा आहे. उण्या-अधिकाची माफी असावी. पत्राचें उत्तर याव. लोभ असावा ही विनंति. सर्वांस आशीर्वाद व नमस्कार.

आपला
नम्र बंधु
मास्तर

## विठ्ठल सीताराम गुर्जर

श्री

पुणें शहर
३०।८।१७

स. सा. न. वि. वि.

आपलें पत्र पोंचलें. कालचीं प्रुफें काल रवाना केलीं. याच अदाजानें पाहता ७ व्या फॉर्मांत पाचवा अक पुरा होतो व पुढें दोन फॉर्म उरतात, त्यातील ३२ पानात हस्तलिखित पन्नास पानें होतात, मग सहावा अक २० पानें घेण्याबद्दल आपण का लिहिलें हें कळत नाहीं. माझ्या अदाजात चूक होत असल्यास तावडतोब उलट टपालीं कळविणेची अवश्यमेव तसदी घ्यावी. उद्या सहावा अक कापून तयार करणार आहें. फोटो आले असल्यास मजला दाखविण्याची आवश्यकताच आहे असें नाहीं—कृपा व्हावी शिवराज मडळींत पुण्यप्रभावाची एकच दिवस तालीम होऊन पुन्हा कृष्ण काचनाची उजळणी चालली आहे. रा. गोविंदराव आपलें नाटक स्वत वाचीन म्हणताहेत, परतु मी तें स्वताच वाचण्याचा आग्रह धरिला आहे. त्याना वेळ सापडताच वाचून दाखवितों. Humour घालावयास आपण तयार आहा काय ? असावें हें उत्तम. आमच्या घरात सध्या आजार नराच झाला आहे. ती. ग मा. मातोश्री या आठवड्यात संधियातान आजारी आहेत. आज तब्बेत जरा बरी आहे, म्हणून सहावा अक तपासून पाठ विण्यास वेळ लागला. सर्वांस नमस्कार व आशीर्वाद. प्रस्तावना पाठवितों. कळावें पत्राचें उत्तर यावें. लोभवृद्धि असावी ही विनंति.

आपला
नम्र बंधु
"मास्तर'

श्री

गंधर्व नाटक मंडळी
अरबाचा बंगला
खेतवाडी, १० गल्ली
मुंबई, गिरगांव पोष्ट
ता. १५।१२।१७

अनेक आशीर्वाद विशेष—

तुझीं दोन्ही पत्रें पोंचलीं. पुण्याहून मुंबईस येण्याचा माझा बेत नक्की नव्हता. कारण पुण्यास प्लेग जरी वाढत असला तरी आपल्या आळींत प्लेग मुळींच नाहीं. म्हणून पत्र पाठविलें नाहीं. काल गंधर्व मंडळी येथें आली आहे. मी परवा दिवशीं रात्रौ पुण्याहून निघून येथें आलों. माझी प्रकृति चांगली आहे. कांहीं काळजी करूं नये असें ती. ग. भा. मातोश्रींस मुद्दाम सांगणें. धार लॉटरीच्या आपल्या सर्व तिकिटांचे नंबर पत्रोपत्रीं लिहून कळविणें. चि. मनुलाल अद्याप पुणें येथेंच आहे. त्यास वारकास जाण्या विषयीं मी आग्रहपूर्वक सांगितलें आहे व त्यानेंहि कबूल केलें आहे. त्याप्रमाणें चारपांच दिवसांत तो बहुधा वारकास येईल. न आल्यास त्यास पत्र पाठवून मुद्दाम बोलावून घेणें. माझें घड्याळ तेथें असल्यास पाठवून देणें, म्हणजे येथें दुरुस्त करून घेणें सोईचें पडेल. ती. ग. भा. मातोश्री यांस साष्टांग नमस्कार व चौ.स आशीर्वाद. इतरांस नमस्कार व आशीर्वाद. पत्राचें उत्तर यावें. कळावें हें आशीर्वाद.

आ—
**मास्तर**

चि. रा. पांडुरंग बळवंत बापट
देशपांडे यांचे घरीं
मु. वारक, पो. पौड
जि. पुणें.

## शंकर गणेश गडकरी

श्री

अनेक आशीर्वाद विशेष, १५।१२।१७

परवा दिवशीं तेथून निघालों तो येथें येऊन सुखरूप पोचलों. आपण तेथें राहू नये प्लेग वाढत असल्याचें समजतें. तरी आपण शक्य तितक्या लौकर वारकास जाणेंचें करावें. किंवा येथें येण्याचें करावें. गधर्व मंडळी काल येथें आली आहे. आपली कांहींहि गैरसोय होणार नाहीं. आपण पुण्यासच राहिला तर तिकडे ती. ग. भा मातोश्रीस व इकडे मजला काळजी वाटत राहणार तरी आपण याचा विचार करावा. कॉलेजसाठीं तिथें राहि लेंच पाहिजे असें नाहीं. पत्राचें उत्तर यावें. नानामामा यास नमस्कार. रा. भाऊसाहेब यास नमस्कार. कळावें हे आशीर्वाद.

आपला—

**मास्तर**

## पांडुरंग बळवंत बापट

मुंबई

२८।१२।१७

श्री

पत्ता—गंधर्व नाटक मंडळी

अरनाचे बगल्यात

खेतवाडी, १० वी गल्ली

गिरगाव पोस्ट, मुंबई

अनेक आशीर्वाद विशेष—

काल सकाळीं तुझें पत्र मिळालें. पाचचार दिवसापूर्वी वारकचे पत्त्यावर तुझें नावां पाठविलेलं पत्र मिळालें असेलच. आज सायंकाळीं रा. भाऊसाहेब सिन्नर कर याचें पत्र आलें त्यावरून चि मनुताळ व तू काल दुपारीं वारकास निघून गल्याचें कळतें तूर्त सर्वांनी तेथेंच रहावें. पुण्यातील प्लेग अजिबात कमी होई पर्यंत आता उगाच पुण्यास येण्याचें करू नये. माझी प्रकृति खुशाल आहे. कांहीं काळजी करू नये. सौ स उरवडें येथे वगैरे पाठवू नये, असें ती. ग. भा. मातोश्रीस मुद्दाम बजावून सागावें चि. बाबुराव वारकास आले कीं

नाहीं तें कळविणें. त्याचें कुटुंब प्रसूत झालें असल्यास कळविणें. ती ग. भा. मातोश्रीस स. नमस्कार. चि. मनुबाळ यास आशीर्वाद. इतरास आशीर्वाद व नमस्कार. पत्र पाठवून सर्वांची खुशाली वरचेवर कळवीत जाणें. कळावें हा आशीर्वाद.

आ.
मास्तर

चि. रा. पांडुरंग बळवंत बापट
देशपांडे यांचे घरीं
मु. वारक
पो पौड
ता. हवेली, पेटा पौड
जि. पुणें

## विठ्ठल सीताराम गुर्जर

श्री

पुणें शहर
२७।५।१८

स. सा. न. वि. वि.

रा. कोल्हटकराबरोबर आपण प्रहसनाची पुस्तकें पाठविलीं नाहीं हें पाहून मनाला अत्यंत वाईट वाटलें. मी इतक्या अगत्यपूर्वक लिहूनहि आपण पुस्तकें पाठविलीं नाहींत हें मी माझं दुर्दैव समजतों. तीं पुस्तके मी कोणासहि कधींहि देत नाहीं. केवळ आपणच होता व तेंहि हातघाईनें आलात म्हणूनच मीं दिलीं आपलें काम झाल्यावर मी दोनचार वेळा आपणाजवळ मागितलीं. परंतु आपण पुस्तकें आणिलीं नाहींत. आपणास मी ज्यास्त तरी काय बोलणार ! तापटपणानें आपण उगीच अर्थाचा अनर्थ करून बसायचे ! तरी कृपा करून, मुद्दाम तसदी घेऊन, शक्य तितक्या त्वरेनें, पोस्टमार्फत रजिस्टर करून पुस्तकें सर्व (एकवीस) अवश्यमेव पाठवावींत. मला तूर्त त्यांची फार जरूर आहे दोन तीन दिवसांत पुस्तकें आल्यास मला मुंबईपर्यंत तेवढ्यासाठीं अशा स्थितींतहि यावें लागेल. आपणास असें लिहिण्याची वेळ यावी हें माझें दुर्भाग्य होय. कारण वडील बंधूचा आदर देऊनच आजपर्यंत मी आपणाशीं

वागत आलों. अधिकोत्तराची मन.पूर्वक क्षमा असावी. पुस्तकें सर्व लौकरच येतील अशी पूर्ण आशा आहे. फळावें लोभ असावा ही विनंति.

आ. नम्र बंधु
रा. ग. गडकरी


ती. रा. विठ्ठल सिताराम गुर्जर
जगनाथाची चाळ, फणसवाडी
काळबादेवी, मुंबई

# राम गणेश गडकरी
# यांना आलेलीं पत्रें

••••••••••••••••••••••••••

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर
भास्करराव विठोजीराव जाधव
वासुदेव गोविंद आपटे
त्र्यंबक बापूजी ठोमरे
नरहर गणेश कमतनूरकर
वामन मल्हार जोशी
शंकर बापूजी मुजुमदार
विठ्ठल सीताराम गुर्जर
गोविंद सदाशिव टेंबे
नारायण हरि आपटे
बापूराव ठोमरे
गणेश विठ्ठल कुलकर्णी
गणेश गोविंद बोडस
त्र्यंबक सीताराम कारखानीस
माधव केशव काटदरे
गोविंद गोपाळ टिपनीस
आनंदराव कृष्णाजी टेकाडे
भार्गवराम विठ्ठल वरेरकर

## श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

जामगाव
१० ११ १२

रा. न. वि. वि.

आपलें पत्र पावलें. आपली प्रकृति सध्या वरचेवर नादुरुस्त होती हें वाचून फारच वाईट वाटलें. आपली प्रकृति चांगली राहील तरच आपल्या हातून अधिकाधिक व सुंदरतर ग्रंथरचना होणें शक्य आहे. म्हणून वाटेल त्या उपायानें आपण प्रथम आरोग्य संपादन केलें पाहिजे. मला गेल्या वर्षी टवनाथपासून फार फायदा वाटला. आपण त्याचा जरूर अनुभव घ्यावा.

इतका अभ्यास करून परीक्षेस बसता आलें नाहीं ही तर फारच वाईट गोष्ट झाली. परंतु परीक्षा व आरोग्य यापैकीं एकच जर साध्य असेल तर आरोग्यच इष्ट आहे. शिक्षणाचा संस्कार आपल्या मनावर झालाच आहे. परीक्षेनें त्यात फारशी भर पडण्यासारखी नाहीं. आरोग्य राहून परीक्षेत टक्कून यश मिळण्यासारखें असेल तरच तिच्या नादीं लागावें, नाहीं तर तो नाद अजीबात सोडून द्यावा.

आपण नवीन नाटक लिहीत आहात ही फार आनंदाची गोष्ट आहे. तें नाटक आपण बहुधा भारत नाटक मंडळीकरिताच लिहिण्यास घेतलें असलें पाहिजे. त्या मंडळीस सध्या नाटकाची फार उणीव आहे. अशा वेळीं आपण कडून त्यास मदत झाल्यास फार उत्तम होईल. मीही पुढील महिन्यात एक गद्य नाटक लिहीन म्हणतों. परंतु अजून संविधानक नीट जुळत नाहीं. रा. टिपनीसांची त्या नाटकाबद्दल बरीच उच्च कल्पना असल्यामुळें तर फारच भीति वाटत आहे.

आपली मनोरंजनातील कविता मी नेहमी वाचीत असतों. आपल्या कवितेविषयीं मजशिवाय इतरांचेंहि अनुकूल मत आहे असें सभापणाचे प्रसंगीं दिसून येतें.

माझ्या ज्योतिषविषयक निबंधाचा बहुतेक भाग छापून तयार झाला आहे. उपोद्‌घात, प्रस्तावना, विषयानुक्रमणिका, परिशिष्टें व सूचि हींच काय तीं छापावयाचीं राहिलीं आहेत. तीं या महिन्याच्या अखेरीपर्यंत तयार होतील असें वाटतें. गेलीं चार वर्षें बहुतेक सारखा लेखनव्यवसाय सुरू असल्यामुळें डोक्यास फार क्षीणता आली आहे.

अजून मजकडे प्रेमसंन्यासाची हस्तलिखित प्रत आली नाहीं. आल्यावर ती वाचून मी आपल्या सूचना आपणास कळवीन. परंतु माझें मत असें आहे कीं कर्त्यानें दुसऱ्याकडून छाटाछाट करण्यापेक्षा स्वतःच करणें पुष्कळ बरें. मला स्वतःच्या नाटकांतील एक वाक्य काढणें किती जिवावर येतें याचा आपणास अनुभव असेलच. आपल्या नाटकांतील अश्लील परंतु चटकदार वाक्यें काढणें तर फारच कठिण जाईल. परहत्येपेक्षा आत्महत्या शतपटीनें पुरवते. शिवाय माझे डोळेंहि हल्लीं किती काम देईल याची शंका आहे. तथापि आपली इच्छा असल्यास मी सूचना करावयास तयार आहें. आपलें नवें नाटक भारत नाटक मंडळी रंगवर बसविण्यास घेऊन मला आणखी कांहीं महिन्यांची सवलत देण्यास तयार असल्यास मी आपलें नाटक विशेष सावधगिरीनें वाचीन.

मी स्वतःचा फोटो एकदाच काढविला, व त्याचा ब्लॉक आपणास रा. मित्राकडून मिळतच आहे. मजपाशीं फोटोची प्रत शिल्लक असती तर मी ती पाठविली असती. परंतु त्याचा आपणास अधिक उपयोग होण्या-सारखा नव्हताच.

'गरीब बिचारे पाइस' ही गोष्ट आपल्यासारख्यास आवडलेली पाहून अत्यानंद होतो.

रा. परांजपे येथें येणार त्या वेळीं आपण जरूर यावें. आल्यास मला आनंद होईल.

क. लो. अ. हे. वि.

आपला
श्री. कृ. कोल्हटकर

श्री. रामराव गणेश गडकरी, पुणें.

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

खामगांव
२६-११-१२

सा. न. वि. वि.

आपलें पत्र पावलें. त्यापूर्वीं ४–५ दिवस आपलें नाटक रा. घेतकरकडून त्यांच्या पसंतीस आलें होतें. मी तें गेल्या रविवारीं काळजीपूर्वक वाचिलें. आपण पुण्यास मला तें वाचून दाखविलें होतें तेव्हा कच्याच गोष्टी माझ्या

लक्षांत आल्या नव्हत्या. पण या खेपेस मी स्वत च वाचल्यामुळें त्या सर्व लक्षात आल्या, व त्यावरून मी खालील सूचना करीत आहें. आपण प्लेग मुळें मुंबईस जागार आहात, त्यापेक्षा प्रथमच इकडे आल्यास मी आपणास समक्षच माझ्या सूचना समजावून देईन. शिवाय नाटकात बऱ्याच ठिकाणीं कल्पनांची नसली तरी शब्दाची पुनरुक्ति झाली आहे; ते भाग गाळावे लागतील, व लाखलचक आत्मगत व इतर भाषणें आखूड करावीं लागतील. या गोष्टी आपल्याच विचारानें झालेल्या बऱ्या. सबब मुंबईस न जाता किंवा मुंबईस एखादा दिवस राहून व माझें पत्र रा. केतकर यास दाखवून नतर लागलीच इकडे यावें म्हणजे आपलें नाटकही लवकर तयार होईल, व माझें नाटक शिद्दावयास मीहि मोकळा होईन.

## महत्त्वाच्या सूचना

१. रेल्वेस्टेशनवर बाबासाहेब व तात्यासाहेब यांनी खाजगी गोष्टींची वाटाघाट करावी हें ठीक नाहीं. बाबासाहेबानीं घटा होईपर्यंत वादाचा विषय काढला नाहीं, व कमलाकर निघून गेला नसता तर त्यास तो काढताहि आला नसता सबब त्यानीं घरून निघण्याच्या पूर्वीच तो एकान्तात काढावयास पाहिजे होता.

२. गोकुळास आयुष्यातील गत गोष्टीनें स्मरण रहातें, याचें कारण स्पष्ट व्हावयास पाहिजे.

३. सुशीलेच्या पुनर्विवाहासंबधाच्या नाजूक गोष्टी स्त्रियानीं पुरुषादेखत बोलाव्या हें ठीक नाहीं.

४. प्रेक्षकाची मनोरमेबद्दल सहानुभूति रहाते, पण जयताबद्दल मुळींच रहात नाहीं हें नीट नाहीं. अखेर ती पातिव्रत्याकरिता आपल्या प्राणाकडे पहात नाहीं, हें कळल्यावरहि जयत तिचा विचार मुळांच करीत नाहीं सारखा लीलेबद्दल विचार करितो. अखेरील 'लग्न झाल्यापासून एक क्षणच काय तो पापविचाराचा गला' असे तो उद्‌गार काढतो तेव्हा तर तें हास्यास्पदहि होतें.

५. वसंताची वहीण पळून गेली हें कळल्यावर तात्यासाहेब त्याची कींव करीत नाहींत, इतकेंच नाहीं तर त्याचें मुखावलोकनहि करीत नाहींत तथापि वीणेचीं उमेद भाषणें ऐकूनहि तिला त्याची भेट घेण्याला परवानगी देतात. जयत व लीला याचें प्रत्यक्ष अलिंगन पाहूनहि जयतास आपल्या घरीं राहू देतात, हें विलग दिसतें.

६. जयत व लीला याचें कृत्य पाहून तात्यासाहेब रागात असता सुशीला

तेथेंच त्यास वीणेचें पत्र देते, व ते तिजबद्दल चर्चा करितात, हें बरें दिसत नाहीं.

७. मनोरमा तारात अडकते, व काहीं वेळानें स्टेशनचे लोक येईपर्यंत तशी टांगलेली रहाते हें असंभाव्य दिसतें.

८. दरोडेखोरास आपण नोट न देता पत्र दिलें हें कमलाकरास फार उशीरानें का कळावें? पत्राबद्दल व पैशाबद्दल त्याची उदासीनता का?

९. सुशील व विद्याधर याचे लग्नप्रसंगीं त्यानें तिच्या कानात कुजबुजावें, तिनें त्याच्या हातावरील डाग पहाणा हें विलक्षण दिसतें.

१०. विष घेतल्यानतर बराच वेळ लीला बोलत असते यावरून विषाच्या उद्दाल्यणाविषयी इतरास सहाय घेऊन त्यानीं वैद्यास बोलावावयास पाहिजे, अगर लीलेचें भाषण फार संक्षित असावयास पाहिजे

मग ज्या गोष्टी विलग दिसल्या त्या वर दिल्या आहेत. या सुधारणा अमलांत आल्या म्हणजे मग भराभर करावयाची काय ती राहील, व ती मला आपल्या विचारावाचून करिता यावयाची नाहीं.

माझ्या नवीन नाटकाचे विषय प्रीतिविवाह व जातिभेद हे आहेत. परंतु सविधानक व पात्राचे स्वभाव हीं रोजरोज बदलत आहेत. त्यास निश्चित स्वरूप कधीं येईल तें येवो काहीं झालें तरी १५ नोव्हेंबर डिसेंबरच्या सुमाराला मला नाटक लिहावयास सुरवात करून सालअखेर तें पुरें केलें पाहिजे.

बरकर मजकूर भेटीअंतीं.

आहेच. तें नाटक हल्लीं रा. रा. खाडिलकर यांचेपाशीं असल्यामुळें तें त्यांजकडूनच परस्पर मागवून घ्यावें असें रा. रा. मुजुमदार यांचें पत्र आलें आहे. तें त्यांजकडून त्याच्या अभिप्रायासह मागून रा. रा. शंकरांकडे पाठविणें आपणांस शक्य आहे काय? नसल्यास मला रा. रा. खाडिलकरांचा पत्ता कळवावा.

मी एक कविता लिहिली आहे; ती मनोरंजनच्या पुढील अंकात आपणांस वाचावयास मिळेल. तिजवरील आपलें मत सवडीप्रमाणें कळवावें.

ज्ञानप्रकाशांत 'नियादरणा' वर टीका करणारा 'नाम्यलेल्टन' कोण? रा. रा. माळ्यांनीं मला सांगितलेलें काम झालें नाहीं.

क. लो. अ. हे वि.

आपला

श्री. कृ. कोल्हटकर

श्री. रामराव गणेश गडकरी
१३६ कसबा, पुणें शहर

## भास्करराव विठोजीराव जाधव

कळवे

ता. १४ ११ १३

रा. रा. कविवर जावई* बुवा = बाळक्या = बाळकराम = राम गणेश गडकरी स्वामी गोसावी यांसी कृतानेक सहस्र साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना. तागाईत मजकूर पावेतों सुखरूप असे. आपलें ता. १२ चें पत्र पोचलें. मजकूर कळला. त्याचे आदले दिवशींच इनाक्युलेशन केल्यानें ता १२ व १३ रोजीं ताप आला. आजही थोडा ज्वरांश आहेच. पण पत्र निकडीचें असल्यानें ही तसदी देत आहें त्याची माफी असावी.

एखादा रुसलेला खानदानीचा जावई सासुरवाडीचें प्रेमाचें आमंत्रण ज्या दिमाखीनें उडवून देऊन आपलें करणें अगदीं रास्त होतें असें भास निर्माण्याचा प्रयत्न करितो व सासुरवाडीच्या मंडळींना कसलीही पोकट सबब

---

* कविवर = गोविंदाग्रज = गोविंद + अग्रज = कृष्ण + अग्रज = कृष्ण सर्प + अग्रज = जामाता (जामाता कृष्णसर्पश्च पावको दुर्जनस्तथा) या स्मृतीच्या आधारें = जावईबुवा.

पुढच्या चांगल्या वर्तणुकीच्या आशेवर आपणास कबूल आहे असें दाखवावें लागतें तशीच जवळ जवळ माझी स्थिती झाली; व आपणावर जावईपणा कसा येतो हें हुडकूं लागतांच तो बेमालूमपणें सापडला हें मागील पानावरील टीपेवरून दिसत आहे. आपण आपल्या स्वीकारलेल्या नांवावरून सध्यांच्या भूमिकेची जाणीव दिलीत. त्याचप्रमाणें आपलें राम हें नांव ज्योतिषाच्या सल्ल्यावरून दिलेलें असल्यास फलज्योतिषाविषयींच्या मतांत अगदीं जरूर दुरुस्ती आणि तीही, रा. माटे यांच्या मताप्रमाणें दुःखपर्यवसायी नाटकाची आनंदपर्यवसायांत केली पाहिजे, तशा प्रकारची करावी लागेल. रामानें "पुढच्या आशेवर बहु-धाम्या कालक्रमणा केली" असा कबुलीजबाब दिला आहे व आपण तसेंच वागून त्या संप्रदायाचा उपदेशही चालविला आहे. बरें आपल्या आशेवर मी राहतों. पण वर्तमानकाळाला मी जितकें महत्त्व देतों तितकें भविष्यकाळाला मुळींच देत नाहीं हें नमूद करितों.

आपल्याला येण्यास अडचण होती तर अगोदरच तसें सांगितलें असतें तर मी आपणास जबरदस्तीनें तोंडांत बोळा देऊन व तिसऱ्या मजल्यावरून दोर सोडून पळवून नेलें असतें असा आपला समज असला पाहिजे. पण तसें झालें असतें तर प्रेमसंन्यासांतील त्या प्रवेशांत बराच बदल करावा असें आपणांस वाटलें असतें.

आपण जी अट घातली आहे व पुढच्या आशेवर लोंबकळत ठेवलें आहे ती कशी पुरी पडणार ? आपण पंधरा दिवसांनीं येणार किंवा ३।४ अंक लिहून येणार ? दोहींचा सांधा बसेल असें मला तरी वाटत नाहीं. नवीन गांवीं नाटक मंडळीच्या गडबडींत नाट्यदेवता फिदा होते असें आपणास वाटत आहे पण ही गोष्ट आजची नाहीं. महाराष्ट्र नाटक मंडळी येथें असतांना हें नाटक लिहिणें आपणास कितपत साधलें हें मला माहीत आहे. त्यावेळीं आपण व गोविंदराव टिपणीस यांनीं दहा दिवस आपला मुक्काम मुद्दाम येथें वाढविला हें मला विसरतां येत नाहीं. पण लिहिण्याचें काम दहा ओळीदेखील आपल्याकडून झालें नाहीं. कोल्हापुरांत नदी, तळीं वगैरे जलाशय अनेक असल्यानें या हवेंत आलस्य येतें असें असल्यास निपाणीचा अनुभव घ्यावा. पण तो अनुभव ५।६ दिवसांपेक्षां जास्त न घेतलेला बरा. निपाणीच्या कोरड्या हवेंत कवित्वस्फूर्ति आढून गेल्यास कळंब्यास यावें व येथील शांत जलाशयावर तरी नाटक पुरें करण्याची कामगिरी होते कीं नाहीं पहावें. मी येथें आपणास त्याच कामगिरीस लावणार होतों. जागा आपण एकदां पाहिली असती तर आपणांस पसंत पडली असती. मला कवित्वशक्ति मुळींच नाहीं तरी कांहीं कविता करावी अशी इच्छा होते.

ता. २५ नंतर मला देवासकडे जावें लागेल असें वाटतें. तिकडे मुक्काम सहज १५।२० दिवस होणार. डिसेंबरात परत आल्यास मुक्काम फार थोडा होईल. कारण नाताळांत मराठा परिषदेस जावयाचें. याकरितांच माझी आपणास शिफारीस होती. बरें असो. आपले मर्जीप्रमाणे करावें. ॥ निरंकुशा: कवय: ॥
कळावें हे विनंति.

रावसाहेब रेगे हे आपणास त्या भागात भेटण्याचा संभव आहे.

आपला

भास्करराव जाधव

## वासुदेव गोविंद आपटे

श्री

आनंदमंदिर, जुना तोफखाना

इंदूर, ता. ३ ४ १४

रा. रा. नमस्कार,

आपलें पत्र आजच मिळालें. पाहून फार आनंद झाला. त्यापूर्वी 'ज्ञान प्रकाशात'लें मराठी भाषेविषयींचें आपलें पत्र वाचून आपण गोवें प्रांतीं गेल्याचें कळलें होतें. पण तिकडे जाण्याचें कारण काय याचा अंदाज होईना. आपल्या पत्रानें खुलासा झाला.

आपण माझ्या प्रकृतीविषयीं प्रथम चौकशी केली याबद्दल मी खरोखर फार आभारी आहें. माझ्या मित्रांना इतःपर (निदान तूर्त तरी) माझ्या प्रकृतीबद्दल काळजी करण्याचें कारण परमेश्वरानें ठेविलें नाहीं हें कळविण्यास मला आनंद वाटतो. माझी प्रकृति इंदुरास येण्यानें फार सुधारली येथें आल्यापासून डाक्तराची व माझी सदा सहा महिन्यात गाठ पडत नाहीं पुण्यात असताना गेलीं तीनचार वर्षे नुसत्या दुधावर होतों तो आता एक वेळ चांगला जेवतों. रात्रीं नुसत्या दुधावर राहतो.

आपण बी. ए. होऊन युनिव्हर्सिटीला रामराम ठोकला कीं त्याच्या अगोदर, तें मी इकडे असल्यामुळें कळलें नाहीं.

आपला मुक्काम तिकडे किती दिवस असणार आहे? सदा मे महिन्यात पुण्यास येणार आहां काय? येणार असल्यास गाठ पडेल. कारण मी ता. १०।११ मेच्या सुमारास पुण्यात असेन

आपल्या पत्राबरोबर रा. गुर्जर यांच्या कविता आल्या आहेत. त्यावर वृत्ताचें नाव किंवा चाल वगैरे कांहीं एक लिहिलेलें नाहीं व आत चुकाही पुष्कळ आहेत. आपण त्या एकदा पाहून व दुरुस्त करून व चाली लिहून पाठवाल तर बरें होईल. सवडीप्रमाणें त्या आनंदात प्रकाशित करीन. मी स्वत कवि नसल्यानें आपणास तसदी द्यावी लागत आहे.

कवि तांबे हे इंदुरास नाहींत. येथून चाळीस कोसावर एका ठाकराचें लहानसें संस्थान आहे तेथें ते मुख्य कारभारी आहेत. येथे कधीं कधीं येत असतात, तेव्हा भेटतात. ते आता पुन्हा येतील तेव्हा आपला नमस्कार त्याना कळवीन.

रा. राहाळकर मात्र येथें आहेत. त्यानाही आपला नमस्कार कळवीन.

आपण गोवें प्रांतीं आहा. तेव्हा तिकडील प्रांतातल्या विशेष कांहीं चाली रीती, सणवार, किंवा इतर कांहीं गमतीची माहिती व फोटो वगैरे पाठवून 'आनंदा'ला साह्य कराल अशी मला पूर्ण उमेद आहे.

'आनंदा'ला एक दोन पावडें पूर्वीचीं आहेत व आणखीही एक गुढी पाडव्याला मुंबईला झालें आहे असें ऐकतों तरी त्याच्यावर वाचक मंडळींचा लोभ कमी झालेला नसून उलट तो वाढत आहे व आज ३००० घरांतून तो मुलाना आनंद देत आहे. येत्या वर्षापासून त्यात रंगीत चित्रेंही देण्याचा विचार आहे. हें बरेंच मोठें खर्चाचें काम अंगावर घेणार आहें. तरी गोवें प्रांतीं त्याचा प्रसार अधिक करण्याचा शक्य तो प्रयत्न करण्याविषयीं आपणास सांगावयास नकोच. आनंदावर आपला जो लोभ आहे तोच त्या कामीं आपणास प्रवृत्त करील अशी माझी खात्री आहे.

तसेच आनंदासाठीं 'सकाळचा अभ्यास' यासारखे गमतीचे चुटके मधून मधून पाठविण्याविषयीं आपणांस माझें आग्रहपूर्वक सांगणें आहे. विनोद आपल्या स्वभावात आहेच लेखनकलेचीही आपल्यावर कृपा आहे. फक्त इच्छा आणि फुरसत पाहिजे पूर्वीं अभ्यासाची सवय होती आतां तीही नाहीं. तेव्हा वेळात वेळ काढून असे लेख पाठविण्याविषयीं माझी आपणास आग्रहाची विनंति आहे ती आपण मान्य करून लवकर कांहीं लेख व मुलाना गमत वाटेल अशा कविता पाठविण्याची कृपा करावी. 'आनंद' त्याची मार्गप्रतीक्षा करीत आहे.

आपली प्रकृति गतवर्षी बरी नव्हती आता कशी काय आहे?

रा. गुर्जर यास माझा नमस्कार कळवावा. रा. शंकरराव मुजुमदार यासही माझा सा. न. कळवावा.

माझा पत्ता : 'एडिटर आनंद—शहर इंदूर' इतका लिहिला म्हणजे बस आहे. कळावें लो. अ. हे विनंति.

वासुदेव गोविंद आपटे

रा. रा. राम गणेश गडकरी
C/o किर्लोस्कर संगीत नाटक मंडळी
पणजी—नवा गोवा
Panjım—Nova Goan
Portuguese India

## श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

जामगांव
१८-१२-१४

सा. न. वि. वि.

आपलें पत्र पावलें. आपल्या प्रकृतीबद्दलचा मजकूर वाचल्यापासून काळजी वाटत आहे. वेळोवेळीं खुशालीचें वर्तमान कळवीत असावें

आपल्या पत्रापासून मला नेहमीं आनंद होतो. तथापि प्रकृति नादुरुस्त असतां पत्र लिहिण्याचें कारण नाहीं. तिकडून येणाऱ्या इसमाकडून मी आपणा संबंधाचें वर्तमान काढीत असतोंच.

गेल्या जुलई महिन्याच्या १५ व्या तारखेस मला facial paralysıs चा विकार सुरू झाला. गेल्या तीन महिन्यापासून प्रकृति झपाट्यानें निवळत आहे. काळजी करण्याचें मुळींच कारण नाहीं. आजार सुरू झाल्यापासून एक दिवसहि मी कचेरींत गेल्यावाचून राहिलों नाहीं, या एकाच गोष्टीवरून माझ्या प्रकृतीची अटकळ आपणास करितां येईल यंदाचे नाताळांत बहुधा मी मुंबईस जाईन. तेथें आपण भेटल्यास फार आनंद होईल माझे चुलते लवकरच येथें येणार आहेत. त्यांची इच्छा मी येथून जाऊं नये अशी दिसल्यास मात्र मी जाणार नाहीं जाण्याचा बेत तहकूब झाल्यास आपणास तावडतोब कळवीन. आपण कांहीं दिवसांकरितां येथें आल्यास मला किती संतोष वाटेल हें लिहिण्याचें कारण नाहीं.

आपण यंदा परीक्षेस बसणार आहांत ही आनंदाची गोष्ट आहे. परीक्षे करितां लेखनव्यवसाय कांहीं दिवस बंद पडला तरी हरकत नाहीं. बाकी नाटक

आटपत आलें असल्यास व तें १–२ दिवसांच्या नेटाच्या उद्योगानें संपवितां येत असल्यास जरूर संपवावें. विनोदी लेख वाचण्याची उत्कंठा लागली आहे.

वधूपरीक्षेची प्रत आपणांस मिळाली हें अनुमान रा. रा. बाबूराव देशपांड्यांच्या पत्रावरून मीं केलेंच होतें. आपणांस त्या पुस्तकाचें बाह्यांगच का होईना, आवडल्याचें वाचून आनंद झाला.

फ. लो. अ. हे वि.

आपला
श्री. कृ. कोल्हटकर

श्री. रामराव गणेश गडकरी, पुणें शहर

## त्र्यंबक बापूजी ठोमरे

श्री

मालकमपेठ, महाबळेश्वर
३-४-१५

प्रेमपूर्वक सा. न. वि.

आपण मला पैसे देण्याबद्दल अभिवचन दिलें होतें, पण मी येथें ८ तास काम धरिलें होतें त्यामुळें आतां पैशांची उणीव राहिली नाहीं. आपल्या प्रेमळ आश्वासनाबद्दल आपला फार आभारी आहें.

रा. उजगरे ह्यांचीं दोन पत्रें मला आलीं, त्यांत त्यांनीं मला पैशांबद्दल आपणांस विनंति करण्यास लिहिलें आहे. त्यांचे चुलते आजारी असल्यामुळें ते जरा अडचणींत आहेत. यांनीं कदाचित् बाबुबरोबर आपणांकडे एखादी चिठी पाठविली असेल कारण त्यांनीं आपल्या पत्रांत तसें लिहिलें होतें. असो. आपण लवकर व्यवस्था कराल अशी आशा आहे, कळावें.

आपला नम्र,
त्र्यं. बा. ठोमरे

श्री. राम गणेश गडकरी
१३६ कसबा, पुणें शहर

# नरहर गणेश कमतनूरकर

सांगली
ता. १४ मे १९१८

प्रिय भाऊसाहेब,

आपणांस मी मागं एक पत्र पाठविलें होतें त्याचें उत्तर नेहमीप्रमाणें आलें नाहीं. तेव्हां त्यात नवीन असं कांहींच नाहीं आपण पत्र पाठवा वा न पाठवा मला आपलें कर्तव्य बजावलें पाहिजेच

कर्तव्य म्हणण्याचें कारण, परवा एक चमत्कारिक हकिकत माझ्या कानावर आली, ती आपल्या कानावर घालण्याचा माझा मानस आहे आपले स्नेही रा भाऊराव खाडेकर यांनीं नाटक लिहिलें आहे हें आपल्याला विदित आहेच त्यांतील विनोदी पात्रें 'वैगस व वैकुंठ' हीं आहेत असं आपणास मी स्वतः सांगितलं तेव्हां आपण ती आपल्याही नाटकात आहेत तेव्हां तीं काढून टाकण्यास खाडेकरास सांगण्याविषयीं आपण मला सांगितलें होतें तो निरोप त्यांच्या एका जिवलग मित्राकरवीं कळविला रा खाडेकर यांनीं असं सांगितलं कीं तीं नावें त्यांचीं स्वतःचींच असून उलटपक्षीं तीं आपणच त्यांचीं घेत आहात फिरून मी निरोप पाठविला कीं य कश्चित् नावाकरिता मास्तर खोटें बोलणार नाहींत आणि तीं नावें खाडेकरांनीं काढावीत हें चांगलें यावर असा फिरून निरोप आला कीं नावें काढणें शक्य नाहीं सदर नावें दुसऱ्या एका पुस्तकात आहेत तेव्हां या नावावर दोघांचा सारखाच हक्क आहे मास्तरांचेंहि नाटक पुढें आलें नाहीं आणि रा खाडेकर यांचेंहि नाटक पुढें आलं नाहीं तेव्हां कोणाचीं आधीं आणि कोणाचीं नंतर हें ठरविणें अशक्य आहे

ही झाली एक हकीकत आता दुसरी—चार दिवसांपूर्वीं त्यांचा एक मित्र माझ्याकडे आला आणि माझ्याबरोबर फिरावयास जाण्याची इच्छा दर्शवू लागला वाटेंत त्यानें सांगितलें कीं तो आणि दुसरा एक खाडेकर यांचा मित्र असे रा रा देवल यांचेकडे गेले आणि भाऊनें एक नाटक लिहिलें आहे असं त्यास सांगून तें तपासण्याविषयीं विनंती केली नाटकाचें नांव, अथवा संगीत कीं गद्य याविषयीं चौकशी न करिता ती देवल यांनीं त्या दोस्तद्वयास वरचेवर हेडदारलें आणं सांगितलें कीं, जर एखादा चौथींतला मुलगा अडला तर तो फार तर पी ई च्या मुलाकडे शंका विचारण्यास जाईल त्याच्यापेक्षा पलीकडील योग्यतेच्या माणसास विचारावयास जाणें धाडस आहे गावांत ती देवल यांचे खाडिलकर आणि मुजुमदार नावाचे दोन शिष्य आहेत त्यांना प्रथम

तें नाटक दाखवावें अथवा माझा (n. g. k) अभिप्राय काय तें विचारावें असेंही ती. देवल यांनीं सांगितलें. ही हकीकत सांगून झाल्यावर त्याच्या मित्रानें आपली सांगितलें कीं रा. खाडिलकर व रानडे हे मिरजेस वासुदेव शास्त्री खरे यांजकडे नाटक घेऊन गेले आहेत. या सर्व गोष्टींशीं मला कांहीं एक कर्तव्य नव्हतें पण यापुढील हकीकतीनें माझें चित्त खवळलें. त्याच्या मित्रास मी मध्येंच खाडिलकर आपली मदत कां घेत नाहीं असें विचारलें, तेव्हां त्याचें असें म्हणणें पडलें कीं रा. खाडिलकर यांचें नाटक आपल्या नवीन नाटकापेक्षां सरस आहे त्यामुळें आपण त्याच्या मार्गांत घोंगा घालूं असें रा. खाडिलकर यांचें मत आहे. त्या दिवशीं मी कांहीं एक बोललों नाहीं. काल त्याचा एक मित्र रानडे हा मजबरोबर फिरावयास आला आणि वर सांगितलेली हकीकत जरा गुळमुळीत आहे असें सांगून पुन: म्हणाला कीं, 'खाडिलकर यांनीं तरी मास्तरांची बरोबरी कां करूं नये? मास्तरही रा. कोल्हटकर यांचे चेले आहेत आणि खाडिलकर यांनींही त्यांचेंच मनानें शिष्यत्व पत्करलें आहे.' यावर मी त्याला असें सांगितलें कीं इतकीच जर घमेंड असेल तर मी आपली सर्व पुण्याई खर्च करून रा. देवल (काल देवल यांनीं होता होईल तों मी हें नाटक इतक्या लौकर पुढें येऊं देणारच नाहीं असें त्यास बजाऊन सांगितलें होतें) व आपण मोड घालून नाटक गंधर्व मंडळीकडून पुण्यप्रभावाबरोबर बसवितांच अनि मग जो मायेचा पूत असेल त्यानें वर नजर मारून दाखवावी. यावर तो मित्र बोलला नाहीं.

वर सांगितलेले रानडे नावाचे भाऊचे हस्तक लौकरच पुण्यास येणार आहेत असे कळतें आणि ते स्वत तुमच्याकडे येऊन पुढें काय करावें (नाटक बसविण्याविषयी) याबद्दल सल्ला घेऊन मदत करण्याविषयीं विनविणार आहेत आतील हकीकत अशी आहे पाहिजे असेल तर समोर उभे करुन देइन सदर हकीकत कळविली आहे त्याच्याशीं कोणत्या प्रकारची वतर्णूक ठेवायाची तें ठरविणे आपलें काम आहे

आताच बातमी आली कीं बापू हा पुण्यास आला असून भाऊ गाडकर आणि दोन प्रहरीं १२॥ च्या गाडीनें पुण्यास जाणार आहे तो आपल्याकडे येइलच अथवा हें पत्र वाचत असताना तो जवळच असेल, पण सदर पत्र त्याच्या हातात पडणार नाहीं अशी आशा आहे तो गोडबोल्या आहे आपणही त्याच्या वाक्चातुर्यानें भाळता (असे मयाना वाजूला ठेऊन म्हणतांच) पण आपल्याला फिरून बजाऊन सांगतों कीं त्याचें नेहमीं आत एक व बाहेर भलतेंच असतें, असा माझा अनुभव आहे असो

बापूची प्रकृति जरा नादुरुस्त आहे औषध चालू आहे माझा कार्यक्रम ठीक आहे आपल्या प्रकृतीविषयी काहीं कळेल तर बरं स्पष्ट सांगतों उत्तर आपण पाठविलेंच पाहिजे रा धडफळे व रा मनुवाळ यास नमस्कार

क लो अ हे वि

आपला
N G Kamatnurkar

Ram Ganesh Gadkari
Esq
136 Kasaba Peth
Poona City

## श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

जामगाव
२० १० १५

सा न वि वि

आपलें ता १६-१०-१५ चें पत्र पावलें

नाटकांत काहीं फेरफार न करण्याचें आपण दिलेलें कारण मला कबूल आहे परंतु १-२ अश्लील वाक्यें काढण्यास काहीं हरकत आहे का?

तीं सुद्धा राहू देण्याविषयीं आपला आग्रह असला तर तीं ठेवणें भाग आहे.

वीरतनय व मतिविकार हीं दोन नाटकें एका प्रकाशकाकडून निघावयाचीं आहेत, व मूकनायक दुसऱ्या प्रकाशकामार्फत निघावयाचें आहे. वीरतनय व मूकनायक हीं तातडतोब छापावयास घ्यावयाचीं आहेत. मूकनायक छापण्यास सुरवातहि झाली असेल, आपल्या अर्थबोधक टीपा व निबंध तयार होण्यास आणखी २–३ महिने तरी लागतील. शिवाय निबंध प्रत्येक नाटकास जोडणें नीट दिसणार नाहीं. म्हणून वीरतनय व मूकनायक हीं नाटकें टीपांशिवायच काढावीं, व मतिविकार नाटक ज्या अर्थीं वीरतनयानंतर निघणार आहे त्याअर्थी तें आपल्या टीपांसह व निबंधासह निघावें अशी मी तोड काढली आहे. ती आपणास पसंत असल्यास मला कळवावें. मतिविकार नाटक आपलें सर्वांत आवडतें असल्यामुळें ही योजना आपणास आवडेल असें वाटतें. शिवाय तें नाटक लोकप्रिय नसल्यामुळें तें अन्यथा खपेल त्यापेक्षा आपल्या निबंधाच्या योगानें अधिक खपेलहि.

मी नाताळांत मुंबईस जाणार आहें. आपण तेथें आल्यास फार चांगलें होईल. आपण न आला तर मात्र मी पुण्यास १–२ दिवसांकरितां येईन.

आपण आपल्या सर्व कविता छापविण्याचा विचार केला आहे हें पाहून फार संतोष होतो. आपणाविषयीं काव्यभक्तांचें जें प्रेम आहे त्यावरून आपलें पुस्तक अत्यंत लोकप्रिय होईल अशी खात्री वाटते. पुस्तक काढतांना अर्थबोधक टीपा देण्यास विसरूं नये

रा. रा. शंकरराव मुजुमदार, रा. रा. चिंतोबा वगैरे मंडळीस नमस्कार सांगावा.

सवडीप्रमाणें पण लवकरच पत्र यावें.

क. लो. अ. हे वि.

आपला
श्री. कृ. कोल्हटकर

रा. रा. रामराव गणेश गडकरी
किर्लोस्कर नाटक मंडळी
कोल्हापूर

## वामन मल्हार जोशी

Poona
Saturday, 29 April 1916

Mr Gadkari,

I have been travelling from place to place for the last month & may perhaps have to continue doing it for one month more I think you have got proof-sheets of the second part of रागिणी. Please hurry up with the preface I have almost decided to start a Matriculation English Class at Poona and perhaps an Inter Logic Class It remains to be seen what luck attends me there

yours
V. M Joshi

Mr Mitra told me that he had already advertised the sale of रागिणी (which is of coure not out yet, but will be within a week or so as I was told ) So please hurry up

V. M J.

To
Rama Ganesh Gadkari esq
C/o किर्लोस्कर नाटक मंडळी
Bombay

## शंकर बापूजी मुजुमदार

Bombay, 13th Sept 1916

My Dear Gadkari

Your wire just to hand money coming by wire tomorrow—some part of what you require

Going to Kalyan for tomorrow's play

Yours
S. B Mujumdar,

R G Gadkari Esq ,
Kasba
Poona City

## विठ्ठल सीताराम गुर्जर

फणसवाडी, जगन्नाथाची चाळ,
मुंबई ७ १० १६

सा. न. वि. वि.

आपलें पत्र पोचलें. रा. शंकरराव काल्च निघून गेल्याचे कळल्यामुळें मी तिकडे गेलों नाहीं.

रा. केशवराव भोंसले हे 'पुण्यप्रभाव'च मागत आहेत किंवा दुसरें नवीन नाटक मागत आहेत, तें कळवावें, व त्यांना जरूर नाटक द्यावें, अशी माझी नम्र सूचना आहे.

पत्रावलि व पुस्तकें यांचें काय केलें तें लिहावें.

आपण पुण्याबाहेर रहावयाला जाणार हें वाचून फार आनंद झाला मधुन मधून कुशल कळविणें. कृ. लो. अ. हे वि.

आपला नम्र बंधु
वि. सी. गुर्जर

रा. रा. राम गणेश गडकरी
पुणें शहर

## गोविंद सदाशिव टेंबे

My Dear Mastersaheb,

You seem to be too busy With all that I should have liked you to meet me just for a quarter of an hour Wonder when you will be free! Would you mind sending me the manuscript of गर्वनिर्वाण I should so much like to go through it Can you make it convenient to see me to night or tomorrow morning

Poud
16th Nov 1915

With kind regards
Yours Sencierly
Govind Tembe

## श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

खामगाव
१८ १२ १६

सा न वि वि

आपलें पत्र पावलें आज रोजीं तीन फोटो पाठवीत आहें त्या सर्वांत लहान फोटो आहे तो आपण ठेवून घेतला तरी चालेल बाकीच्या फोटोंच्या प्रती मजजवळ नाहींत सबब ते जरूर परत पाठवून द्यावे आपलें पत्र आज सकाळीं पावलें त्यामुळें फोटो मंडळीबरोबर पाठविता आले नाहींत

वरकड मजकूर भेटीअंतीं

क लो अ हे वि

आपला
श्री कृ कोल्हटकर

रा रा रामगणेश गडकरी
किर्लोस्कर नाटक मंडळी, जळगाव

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

जामगांव
२०-४-१८

सा. न. वि. वि.

आपलें पत्र पावलें. आपण अजून आजारी आहांत हें वाचल्यापासून काळजी वाटत आहे. वेळेवर औषध घेत गेल्यास व पथ्यपाणी केल्यास लवकरच आराम पडेल. मीहि गेल्या ११ महिन्यांपासून आजारी आहें. हल्लीं ताप नाहीं. पण खोकला बराच आहे; व क्षीणताहि बरीच आहे.

आपण भावबंधन लिहिल्याचें व तें अत्यंत सुंदर झाल्याचें वर्तमान रा. गुर्जरांकडून कळलें. फार आनंद झाला. अशीं आणखी किती तरी नाटकें आपल्या लेखणींतून बाहेर पडण्याची अपेक्षा आपल्या स्नेह्यांस व मराठी भाषेच्या अभिमान्यांस आहे. स्वतःकरितां नाहींतर निदान त्यांजकरितां तरी आपल्या प्रकृतीस जपणें आपलें कर्तव्य आहे. तें आपण पार पाडावें अशी माझी अंतःकरणपूर्वक इच्छा आहे.

आपल्या पुढील पत्रांत आपण तापांतून पूर्णपणें मोकळे झाला आहांत व आपणास पूर्ववत् शक्ति येत आहे असें वाचावयास मिळेल अशी आशा करून पत्र संपवितों.

क. लो. अ. हे वि.

आपला
श्री. कृ. कोल्हटकर

रा. रा. रामराव गणेश गडकरी
१३६ कसबा पेठ
पुणें शहर

## नारायण हरि आपटे

श्री                    कोरेगाव, जि. सातारा
१-५-१८

सप्रेम साष्टांग नमस्कार विनति विशेष—

आज रोजीं निराळ्या बुकपोष्टानें माझी नवीन कादंबरी अवलोकनार्थ पाठवीत आहें. मात्र ती आताच वाचण्याचे भरीस पडू नये. आपली प्रकृति बरी झाल्यावर वाचावी.

आपल्या भेटीस आलों त्या वेळीं आपली प्रकृति फारच अशक्त आणि चिंताजनक वाटली. आता बरी असेल अशी आशा आहे हवा बदलण्या करिता आपण मग साताऱ्यास येणार ना! मी व माझे स्नेही आपली यथाशक्ति सोय लावून देऊं. आपलें कुशल कळविल्यास समाधान वाटेल.

कळावें लोभ असावा ही विनंति.

आपला
ना. ह. आपटे

माझा सध्याचा पत्ता :
कोरेगाव जि. सातारा

रा. रा. राम गणेश गडकरी
१३६ कसबा पेठ, पुणें शहर

## बाबूराव ठोमरे

जळगाव खुर्द
पो. नशिराबाद
पूर्व खानदेश

कळविण्यास अत्यंत वाईट वाटतें की, त्र्यंबकराव ठोमरे बालकवि यांना भादली स्टेशनवर ता. ५ रविवारीं सकाळीं, ६–३० वाजता आगगाडीखालीं सापडून देवाज्ञा झाली.

आपला
बाबू ठोमरे

कविवर्य—राम गणेश गडकरी
कसबा पेठ, पुणे शहर

[पोस्टाचा शिक्का : नशिराबाद:–५ मे १८, पुणे शहर:–६ मे १८
—संपादक]

## विठ्ठल सीताराम गुर्जर

मुंबई
८-५-१८

स. सा. न. वि. वि.

माझें मागचें पत्र पोंचलेंच असेल. रा. मित्र मागल्या महिन्याचा पगार द्यावयास तयार झाले असल्यामुळें फिर्याद करावी लागणार नाहीं असें दिसतें. पुढील हकीगत पुढल्या पत्रीं लिहितों.

आपल्या तब्येतीबद्दल कांहींच कळत नाहीं. तरी उलट टपाली कळवावें.

रा. ठोसरे परलोकवासी झाल्याचें वाचून फार वाईट वाटलें. रा. कुलकर्णी त्याचा फोटो नवयुगाच्या येत्या अंकात देणार आहेत. आपली 'बाल्कवीस' ही कविता त्याबरोबर छापावी, असा त्याचा उत्कट हेतु आहे. तरी ती कविता चि. बाळूकडून उतरून रा. कुलकर्णी यांजकडे पाठवून देण्याची कृपा करावी. मनोरंजनाचा आपला संबंध आता माझ्याबरोबर कायमचा तुटला आहे.

माझ्या नाटकाचीं पदें करावयाला मीं सुरवात केली आहे. भावबंधनाचें काय झालें ? उत्तर उलट टपालीं यावें.

क. लो अ हे वि.

आपला
अण्णा

[श्री. गुर्जर यांच्या या पत्रावरच श्री. कुळकर्णी यांनी पुढील ओळी लिहिलेल्या आहेत. —संपादक]

## गणेश विठ्ठल कुलकर्णी

My dear master,

वाङ्मयसृष्टींतील ही धडामोड शारदा मंदिराची दापपोयी मननिगान्या मनाला शाजेशी असली, तरी कोणीही कोर्टदरबारची पायरी चढू नये असें वाटल्यामुळें रा. ढंग यांच्या मध्यस्थीनें बहुतेक प्रकरण मिटविलें आहे.

रा. ठोंबरे वारले ! वाईट झालें. आगगाडीखालीं सापडून शरीराचे तुकडे होणें हें मरण येथांही दुःखकारकच होय. त्यांचा माझा परिचय नव्हता पण त्यांच्या कवितांबद्दल मला आदर होता. 'बाल्कवीस' कविता पाठवावी.

G V. Kulkarni

रा. रा. राम गणेश गडकरी, पुणें शहर

## गणेश गोविंद वोडस

श्री

पुणें
ता. ३० ५-१८

सा नमस्कार वि. वि.

माझा भाचा चि. चिंतामण उर्फ बगाराम याचे लग्ननिमित्त प्रयोजन ता. ३१-५-१८ शुक्रवार रोजीं करण्याचें ठरलें आहे. तरी आपण भोजनास अगत्य येण्याचें करावें. अत्यंत गडबडीमुळें समक्ष सांगण्यास सवड झाली नाहीं, याबद्दल माफी असावी. भोजनाची वेळ ११॥ ते १॥ पर्यंत आहे.

पत्ता : कसबा पेठ, रामभाऊ माळी याचें घर न. ३४३

आपला
गणेश गोविंद वोडस

रा. रा. राम गणेश गडकरी
कसबा पेठ, घर नंबर १३६, पुणें

## त्र्यंबक सीताराम कारखानीस

श्रीराम

सोलापूर
महाराष्ट्र नाटक मंडळी
ता. १७ ६ १८

श्रीयुत गडकरीमास्तर साहेब यांस,

कृ. सा. न. वि. वि.

आपली प्रकृति हल्लीं कशी काय आहे तें कळवावें. आपण सांगितल्या प्रमाणें येथें आपणाकरता चांगली हवाशीर जागा पाहून ठेवली आहे. येथील व्यापारी श्री. गंगाप्पा आपल्या माहितीचे असतीलच. त्यांचा बंगला रिकामा असून हवाशीर व सर्व बाजूंनीं सोयीचा आहे. थिएटरपासून सरासरी १०।१२ मिनिटांच्या रस्त्यावर आहे. तेथें आपली चांगली सोय होईल. येथील डॉ. किर्लोस्करही चांगले अनुभविक असून मंडळीबद्दल त्यांस फार अभिमान व कळकळ आहे. ते आपल्याला काळजीपूर्वक तपासून औषधोपचार करतील. माझी खात्री आहे कीं तुम्ही ती जागा सोडून येथें मोकळ्या

हवेवर आलांत तर नुसत्या हवेनें देखील आपल्यास आराम वाटूं लागेल. कळावें, कृपालोभ असावा हे विनंति.

आपला
अण्णा कारखानीस

रा. रा. राम गणेश गडकरी
१३६ कसबा
पुणें शहर

## माधव केशव काटदरे

२०१ अमृतवाडी, मुंबई ४
ता. २१-७-१८

कृतानेक साष्टांग नमस्कार वि. वि.

आपणाकडे खेळगडीचे चार अंक व एक पत्र मी पूर्वीच पाठविलें आहे. व त्यांत केशवसुत कवि यांच्या कवितेसंबंधीं निबंध लिहिण्यास आपणाला नम्र विनंति केली आहे. आज आपणास नम्रपणें आगली असें सुचवितों कीं आपणाला कार्यबाहुल्यामुळें जर वेळ नसेल तर आपण आपल्या एखाद्या स्नेह्यांकडून लेख लिहवून पाठवावा. पण मुळींच पाठवावयाचा नाहीं असें मात्र करूं नये एवढेंच मागणें आहे. आपणाला अधिक लिहिणें असा माझा अधिकार नाहीं. कळावें. निदान रोष तरी नसावा हे विनंति—

आपला कृपाकांक्षी
माधव केशव काटदरे

रा. रा. राम गणेश गडकरी
१३६ कसबा पेठ, पुणें शहर

## विठ्ठल सीताराम गुर्जर

मुंबई
२५-७-१८

प्रे. सा. न. वि. वि.

रा. दत्तोपंतांनीं इकडील सारी हकीगत कळविली असेल. येत्या शनिवारी सौ. ह्या डोळ्याचें ऑपरेशन करण्याचें ठरलें आहे. डॉ. नाडगीर हे

करणार आहेत. आता सारा हवाला देवावर. आपण जितक्या लवकर याल तितकें माझ्या मनाला समाधान होणार आहे.

क. लो. अ. हे वि.

आपला,

**वि. सी. गुर्जर**

श्री. राम गणेश गडकरी
१३६ कसबा, पुणें शहर

## त्र्यंबक सीताराम कारखानीस

श्रीराम

पुणें, २२१ शनिवार पेठ
ता १-१ १८

श्रीयुत गडकरीमास्तर यास
सा. न वि. वि.

आपण दिलेलें 'जन्मरहस्य' नाटक वाचून पाहिलें. आपला अभिप्राय मनाला पटला. तथापि त्यातले त्यात काता आणि रघुनाथ यांचा प्रथम प्रवेश एक प्रकारच्या नाविन्यामुळें मला आवडला पण एकंदर नाटक म्हणजे रसाचा निवळ चिखल आहे त्रिदंडी संन्यास धारण केलेल्या अर्जुनाप्रमाणे रा. कोल्हटकर हे भ्रमल्यासारखे दिसतात. कोणत्या तरी सुभद्रेकडे दृष्टी असल्यामुळें हातून 'घाली सारें मीठ तुपातची दुर्धी लिंबू पिळिलें' अशी क्रिया घडत आहे. 'काते' वाचून नाटकातील इथून तिथून सगळीं पात्र हृदयशून्य वाटतात. वीष घेतल्यामुळें काता रघुनाथाला आपल्या ओठांना स्पर्श करू देत नाहीं. पण त्या तशा स्थितींतही रा. कोल्हटकरांचें 'रघुनाथ' हें पात्र 'हो, तेंच विसरलों मी! ब्राह्मणकन्या मरताना तिच्या ओठाना शूद्राच्या ओठांचा स्पर्श होऊ देता उपयोगी नाहीं.' असला निर्दयपणाचा फटकारा मारावयास चुकत नाहीं. वास्तविक हा फटकारा नाटककाराच्या मनातून समाजावर ओढावयाचा होता पण झडप घालणाऱ्या वाघावर धरलेला नेम हरिणीवर जावा तशातला प्रकार येथ झाला आहे असेच हृदयशून्यतेचे प्रकार या नाटकात इतरत्रही आहेत. 'दशरथ' हें एक पात्र नाटकाराच्या हातून निर्लेप राहिलेलें आहे पण याचें कारण त्याला अवसरच नाहीं म्हणून अवसर मिळता तर तेंही पात्र काय

करतें कांहीं सांगता येत नाहीं. रा. कोल्हटकरांच्या कोणत्याच पात्रांचा सामान्यतः नियम धरवत नाहीं. उद्धव आणि मालती हें जोडपें तर अपूर्व आहे! अशात हेंचीं पात्रें निर्माण केलीं जातात व विशेषतः रंगविलीं जातात या गोष्टीची उपपत्ति कोणत्या तऱ्हेनें लावता येईल हें नीटसें सांगता येत नाहीं. धैर्य म्हटलें तर तें प्रशंसनीय होईल. मला वाटतें, त्यांच्या याच नाटकात एके ठिकाणीं 'प्रेम अनेकदा अत्यंत कुरूप माणसावर बसलेलें दिसून येतें' या गोष्टीचें रहस्य सांगितलेलें आहे. तेंच असल्या पात्रावरील अनुरक्ततेसंबधानें खरें असावें. 'कुरूप माणसाच्या चर्येत, वाणींत, विचारात प्रेमानें क्रांति घडून येते आणि त्यामुळें तीं प्रेमी जनांना अधिक सुंदर वाटतात' हें जगातील सत्य असेल. पण प्रेमी जनांना आपण व आपला प्रेमविषय याखेरीज जगाची पर्वा नसते तशी नाटककाराला नसते असें म्हणून चालेल काय?

असो. एका वाचनानंतरचे हे प्रथमोद्गार आहेत. आणि आपण ते कळविण्यास सांगितल्यावरून कळविले आहेत. या वाचनामुळें असल्या नाटकाचा प्रयोग पहाण्याची आतुरता झाली आहे. तो पाहिल्याव्रर कसें काय वाटेल कोणास ठाऊक.

आपण लवकर बरें होण्याचें मनावर घ्याल तर बरें होईल. जागा बदलल्यानें आपल्यास खास बरें वाटेल.

कळावें लोभ असावा हे विनंति.

आपला

**अण्णा कारखानीस**

हे. प. 'जन्मरहस्य' नाटकाचीं प्रुफें सोबत पाठविलीं आहेत. मी आज विजापुरास जात आहे.

## गोविंद गोपाळ टिपनीस

श्रीराम

महाड,
ता. २७ ९-१८

अत्यंत—अत्यंत—अत्यंत प्रेमपूर्वक
नमस्कार वि. वि.—

आपला मृत्युलेख आपणच वाचण्याचा मान पितामह दादाभाई यांच्या

पाठीमागून आपणाला मिळाल्याबद्दल आपलें अत्यंत सद्गदित अंतःकरणानें सप्रेम अभिनंदन करतों.

सहाजिक पसरलेल्या मृत्यूच्या खोट्या बातमीनंतर ती ज्याच्या मृत्यूची असेल त्याला पुष्कळ आयुष्य लाभतें असं म्हणतात. ईश्वरकृपेनें हा लोकसमज खरा ठरो आणि आपणास दीर्घायुलाभ होवो!

इंदुप्रकाशाच्या आनंददायक बातमीच्या चिठोऱ्याकडे लक्ष न जाता प्रथमच जेव्हां पत्रातली बातमी वाचली तेव्हां जें दुःख झालें त्याचें वर्णन करण्यास आपणासारखेच 'गोविंदाग्रज' पाहिजेत.

आता आपली प्रकृति कशी आहे तें कळेल तर बरें.

आपला

**गो. गो. टिपनीस**

रा. रा. राम गणेश गडकरी
C/o गंधर्व नाटक मंडळी
ग्रँट रोड, मुंबई

## श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

खामगाव
२८ ९ १८

सा. न. वि. वि.

आपण हवा बदलण्याकरिता मुंबईस आलात हें पाहून आनंद होतो. आता लवकरच आपण मलेरिया तापापासून मुक्त होऊन हिंडू फिरू लागाल अशी आशा आहे. आपणासंबंधानें इंदुप्रकाशात एक अशुभ वार्ता प्रसिद्ध झाली होती, ती आपल्या वाचण्यात आली असेलच. तिची दुरुस्ती लवकरच प्रसिद्ध झाली, पण ती माझ्या वाचण्यात हा वेळपर्यंत आली नव्हती. असो, अशुभ वार्तेनें आयुष्य वाढतें असें म्हणतात, तसं आपल्यासंबंधानें होऊन आपणास लवकरच आराम वाटावा अशी आपल्या सर्व स्नेह्याची अंतःकरणपूर्वक इच्छा आहे. क. लो. अ. हे. वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

ता. क.

मी लहानपणीं लिहिलेलीं दोन नाटकें आपल्या स्वाधीन केलीं होतीं. तीं तेथें असल्यास कांहीं दिवसांकरितां तरी मजकडे पाठवून द्यावीत.

श्री. कृ. कोल्हटकर

रा. रा. रामराव गणेश गडकरी
C/o गंधर्व नाटक मंडळी
पो. ग्रँटरोड, मुंबई

## आनंदराव कृष्णाजी टेकाडे

श्री

ता. २५-११-१८
सोमवार

रा. रा. रामराव गडकरी यांस—
प्रेमपूर्वक सा. न. वि. वि.

वर्तमानपत्रांतील आपली 'मृत्युवार्ता' आणि 'मृत्यु चूक' ह्या बातम्या वाचून सुचलेले विचार.

[उद्यां वध जाते.—या चालीवर]
यादवी ईश ! कविराज ! तुझें आयुष्य । ध्रु० ।
परत पाठवी कृतांत तुजला
हेतु कोणता मनीं योजला
कृती अन्यथा करण्या धजला
नवल दाखविलें ! अजवरि जें नाहीं घडलें ॥ १ ॥
निज दूतानें आणिलें चुकुनी
अनय न व्हावा यमें म्हणोनी
तुज परतविलें पुन्हां मर्त्यजनीं
दावि निज ठायीं ! कीं सदा वसे मति न्यायि ॥ २ ॥
काव्यमतिमापुण्य अजुनि तव
पुरतें कीं नच विकसे अभिनव
पुरा पुरा तन्मरन्दानुभव
मिळो मर्त्यांला ! म्हणुनि का परतवी तुजला ॥ ३ ॥

कीं सुभगेच्या सौभाग्याचा
कुंकुमतिलक ल्लाटावरिंचा
पुसण्या धीर न होय तयाचा
यमहि का भ्याला । तव सतीदिव्य प्रेमाला ॥ ४ ॥

तुझ्या मिषें कीं अपुल्या नयना
उघडुनि पाही तो निज कृतिंना
अकाल हरणें जगतीं प्राणा
शिरीं ये पाप । उमगुनि का आवरि चाप ॥ ५ ॥

काव्य गुणें तो कीं तव मोहुनि
विहित न वसती तव सुरभुवनीं
झर्गिंच परतवी तुजला म्हणुनी
नवरसी पृथिवी । एकची सुधारस निर्दिवीं ॥ ६ ॥

सुरकवि अथवा स्वप्रतिभेनें
दिपेल स्वमनीं या मौतीनें
उचित गमे त्या तुज परतविणें
पराजय स्वजना । वज्रवेल सहजपणिं कवणा ॥ ७ ॥

असो कसेही तरी आनला
ठेवा अमुचा अम्हा मिळाला
कितीक प्रार्थू त्या देवाला
खाउ बाळाला । दे हर्ष तसा समशीला ॥ ८ ॥

कळाव, लोभाची वृद्धि व्हावी ही विनंती

आपला
**आनंदराव कृष्णाजी टेकाडे**

उपाध्याचा वाडा
महाल—नागपूर

गडकऱ्यांच्या 'वाग्वैजयंती'मधला
'मुरली' हा कौस्तुभमणि. त्या 'मुरली'चीं
शेवटचीं चार कडवीं हा
त्या काव्याचा कळस ! हीं चार कडवीं गडकऱ्यांचीं
अत्यंत आवडती असून, नेहमी ते स्वतःशीच तीं गुणगुणत असत.
तीं त्यांच्या हस्ताक्षरात नि स्वाक्षरीसह
येथ दिलीं आहेत.



एक साहित्यसम्राट्
आणि दुसरा संगीतसम्राट्
गडकरी त्यावेळीं २१ वर्षांचे
आणि बालगंधर्व १८ वर्षांचे होते

[गडकऱ्यांनी स्वत:साठी आखलेलें एक वेळापत्रक]

Study
Drama
Writing extra
Reading extra

7–12 = 5 Drama & Extra Reading—
1–5 = 5 Study
7–8½ = 1½ Bapat
9½–11½ = 2 Extra writing
13 Hrs

• • •

[गडकऱ्यांनी लिहिलेली एक जाहिरात]

## प्रयोगासाठीं

**रा. राम गणेश गडकरी**

प्रेमसंन्यासकर्ते
यांनी लिहिलेलें
नवीन नाटक

## पुण्यप्रभाव नाटक

सदरहू नाटक लिहून तयार झालें आहे. ज्या मंडळीस त्याचा प्रयोग करण्याची इच्छा असेल त्यांनी अटींसंबधीं विशेष माहितीसाठीं खालील पत्त्यावर पत्रव्यवहार करावा. नाटक संगीत मंडळी किंवा गद्य मंडळी यांपैकी कोणासही घेता येईल. पत्रव्यवहार ता. १९ मे १९१४ च्या आत व्हावा.

राम गणेश गडकरी
C/o प्रो. गोविंद चिमणाजी भाटे
नारायण पेठ, पुणें शहर.

[कै० राम गणेश गडकरी यांच्या हस्तलिखित टांचणांवरून]

## Plot building & Economy of

# राजसंन्यास

राजसन्यास is a Principle-play the Principle to underlie the plot is that of राज्संन्यास which exactly would mean — सार्वजनिक मनुष्य आणि खाजगी मनुष्य याच्या लक्ष्यात जगजशी जबाबदारी मोठी असेल तसतशी इच्छा मरत जाउन, कर्तव्यमय रक्ष आयुष्य-निरिच्छ आयुष्य-निष्काम निया निजविनी व्हावयास पाहिजे. सर्वात्मक परमेश्वर निर्विकार आहे; राजा हें परमेश्वराचें जड दृष्टीला दिसणारें स्थूल व व्यापक तम स्वरूप आहे; म्हणून राजा हा जगाचा इच्छाविरहित उपभोगशून्य स्वामी आहे.

This theory to be clearly explained to संभाजी by साबाजी in the fourth scene of the first act, and to be actually practised by येसूबाई in the next scene

### Main Characters.

| NO I wrong-side | | | No II right side |
|---|---|---|---|
| संभाजी, रायाजी, तुळशी, दौलतराव, शिवाजी, कृष्णा | दुष्टी | सार्वजनिक जबाबदारी कळणें व न कळणें हें नाटकाचें मुख्य सूत्र. आणि मुख्यतम व्यक्तीच्या कर्तव्यपरायणतेवाचून नाकीच्याची–परिस्थितज्ञाची पुण्याई रद्द होते, ही या सूत्राची व्यवहारिता. या नाटकात सर्वांनीं नुकसानींत येणें अवश्य आहे; कारण, मूळ बिंदु संभाजी शुद्ध नाहीं. म्हणून चागली बाजू चूक नसता नाही दु:ख भोगिते व चुकलेली बाजु आपल्या बेजबाबदारीमुळें नुकसानींत येते. बेजबाबदार जीवाशीं पुण्यजीवाचा संबध आला म्हणजे त्याची पुण्याई निष्फळ होते. | येसूबाई, शिवाजी, साबाजी, हिरोजी, निरणोजि. — दुष्टी |
| No III देहू | | | No III चादणी. |

## प्रकृतींतील भेद-सादृश्यें.

| Group | पात्रें | सादृश्य | भेद |
|---|---|---|---|
| १ | (१) संभाजी<br>(२) येसूबाई | Natural high taste & magnanimity | (१) इच्छेचा अनावरपणा. इच्छा.<br>(२) आवरलेली इच्छा. कर्तव्य. |
| १ | (१) सभाजी<br>(२) तुळशी | इच्छेची प्रबळता व सौंदर्याची जाणीव. | (१) स्वभावजात अढळ उच्चवृत्ति.<br>(२) विकाराचे भरात नष्ट उच्चवृत्ति. |
| ३ | (१) सभाजी<br>(२) रायाजी | इच्छेची प्रबळता व प्रेमाची कल्पना. | (१) इच्छा पापमय मुळीं.<br>(२) इच्छेची पवित्रता आवश्यक. |
| ४ | (१) सभाजी<br>(२) धानाजी | शक्तीचे सद्गुण | (१) विकाराचे भरात सद्गुणांशीं विरोध.<br>(२) सद्गुणाविषयीं विवेकपर आदर. |
| ४ | (१) सभाजी<br>(२) हिरोजी | उतावळेपणा व शक्ति. | (१) शक्तीचा व घाईचा दुरुपयोग.<br>(२) शक्तीचा व घाईचा सदुपयोग. |
| ३ | (१) सभाजी<br>(२) दौलतराव | गुणातील साधर्म्यामुळें हीं पात्रें एकत्र येत नसून परिस्थितीमुळें व बाळपणींच्या सहवासामुळें एकत्र येतात. | (१) अनाठायीं साहसप्रियता.<br>(२) योग्यप्रसंगीं मुळीं साहसशून्यता. |

| Group | पात्रें | साहश्य | भेद |
|---|---|---|---|
| ४ | (१) संभाजी<br>(२) जिवाजी | कर्तबगारी व असहिष्णुता, कर्तबगारीचा दुरुपयोग व परस्त्रीशीं भानगड. | (१) उच्चवृत्ति.<br>(२) नीचवृत्ति. |
| ४ | (१) संभाजी<br>(२) देहू | (१) शिवाजीहून<br>(२) शिवाजी दत्तक } थोर होण्याची इच्छा | (१) अधिक समर्थ पात्रता पण दुरुपयुक्त.<br>(२) पात्रता मुळींच नाहीं. |
| ४ | (१) संभाजी<br>(२) फडश | वाटेल त्या मार्गानें सुखलालसा तृप्त करणें. | (१) तुळशीबद्दलच्या उच्च अभिरुचीनें.<br>(२) चांदणीबद्दलच्या नीच अभिरुचीनें. |
| २ | (१) येसूबाई<br>(२) तुळशी | स्वाभिमान | (१) निरिच्छता.<br>(२) लोभबुद्धि. |
| २ | (१) येसूबाई<br>(२) शिवागी | स्वताचा सोशिकपणा व पतिनिष्ठा. | (१) उग्र कर्तव्यमय प्रेम.<br>(२) स्वत चा विसर पाडण्याइतकी प्रेममयता. |
| २ | (१) येसूबाई<br>(२) चांदणी | थोर पदाचा अभिमान. | (1) High taste.<br>(2) Low taste |
| २ | (१) तुळशी<br>(२) शिवागी | इच्छेची प्रबळता. | (१) इच्छेची पापमयता.<br>(२) इच्छेची पवित्रता. |
| २ | (१) तुळशी<br>(२) चांदणी | लोभबुद्धि व विलासप्रियता. | (१) उच्च वातावरण (sphere)<br>(२) नीच वातावरण ( ,, ) |

| Group | पात्रें | साम्य | भेद |
|---|---|---|---|
| १ | (१) तुळशी<br>(२) दौलतराव | हीं पात्र गुणानं जोडलेलीं नसून दैवानें जोडून आणलेलीं आहेत. त्यांत दुःखाची तीव्रता एवढच साम्य. | (१) साहसप्रिय व Romantic स्वार्थबुद्धि.<br>(२) व्यवहारप्रवृत्तीची साहसशून्य स्वार्थबुद्धि. |
| २ | (१) दौलतराव<br>(२) रायाजी | मराठेशाहींत सारखी पदवी.<br>(१) दर्यासागर (२) सेनासागर. | (१) पदवीला नालायकपणा.<br>(२) पदवीला लायकपणा पण गूढनिद्रित. |
| | (१) निराजी<br>(२) देहू | परिस्थितीनें जवळ आणलेलीं पात्रें. निराजीची साधनापेक्षा व देहूची साधन होण्यासारखी स्थिति, यामुळें जवळ आल्यावर तसें राहणें. | (१) पाजीपणा.<br>(२) सरळपणा. |
| | (१) जिवाजी<br>(२) कट्या | स्वार्थपरायणता. | (१) बुद्धिमत्ता.<br>(२) बुद्धिशून्यता. |
| | (१) सावाजी<br>(२) हिरोजी | सर्व सद्गुण. | (१) धिमेपणा.<br>(२) घाई, किंचित् अधीर. |
| | (१) निराजी<br>(२) चिटणीस | (लिहिलें नाहीं) | (लिहिलें नाहीं) |
| | (१) चिटणीस<br>(२) कडुपा | ,, | ,, |

(अपूर्ण)

Group No 1. वचनभंगदार परिणाम व्यक्तिश: दुःखी पश्चात्ताप तळमळ (भेट) इच्छेविरुद्ध दुःख भागणें सार्वजनिक हितहानी (नाट्य)

Group No 2 अजबदार, पण वचनभंगावर जीवित अवलंबून म्हणून दुःखी, दुःख व्यक्तिश: समाधानी, (भेट) सार्वजनिक हितहानी (नाट्य)

Group No 3 —इच्छा पवित्र कार्य चूक म्हणून सुखी सुखाची degree त्याच्या दर्जाची

[ अपूर्ण ]

# राजसंन्यास नाटकाचें 'कसें व कां ?'

| Why should … suffer ? | |
|---|---|
| Why should संभाजी suffer ? | राजधर्म सोडला म्हणून. |
| ,, ,, येसूबाई ,, ? | संभाजीशीं नशिबानें बांधली म्हणून. |
| ,, ,, तुळशी ,, ? | (१) संभाजीवर मोहित होण्यांत पत्नीधर्म सोडला म्हणून.<br>(२) भलत्या प्रकारची सुखाची कल्पना करण्यांत व भलत्या वेळीं समुद्रांत होडी टाकण्यांत स्त्रीधर्म सोडला म्हणून. |
| ,, ,, दौलतराव ,, ? | तुळशीसाठीं समुद्रांत उडी न टाकण्यांत पतिधर्म सोडला म्हणून. |
| ,, ,, रायाजी ,, ? | प्रेमाच्या नादांत सेनापतिधर्म सोडून बेजबाबदार झाल्यामुळें. |
| ,, ,, शिराजी ,, ? | रायाजीशीं नशिबानें बांधली म्हणून. |
| ,, ,, गणोजी ,, ? | संभाजीशीं नशिबानें बांधला म्हणून. |
| ,, ,, हिरोजी ,, ! | संभाजीशीं नशिबानें बांधला म्हणून. |
| ,, ,, जिवाजी ,, | (१) धर्माची जबाबदारी सोडून विश्वास देहूची चाकरी मिळविण्याची इच्छा घेतल्यामुळें,<br>(२) कर्माची जबाबदारी विसरला म्हणून. |
| ,, भटजी , ? | सेवाधर्माची एकनिष्ठतारूप जबाबदारी विसरला म्हणून. |

## Some guiding Notes

---

(१) सत्ताजीच्या शांतपणामुळें दौलतराव व संभाजी येतात राहतात. हिरोजीच्या घाईमुळें तुळशी, समाजी रुसतात, Final निर्णयालासुद्धा हिरोजीची घाई अन्यरीत्या कारणीभूत होते

(२) ज्या शिवागीमुळें रायाजी बेजबाबदार होतो तीच त्याला सोडावी लागते.

(३) ज्या तुळशीमुळें समाजी बेजबाबदार होतो तीच त्याच्या नाशाला कारणीभूत होते.

(४) ज्या शिकवणीच्या दुरुपयोगानें जिवाजी चढतो तिनेंच तो मरतो

(५) ज्या चांदणीमुळें जिवाजी चळतो तिनेंच तो मरतो

(६) ज्या अज्ञानामुळें माने शिवागीला मारतो त्याच अज्ञानामुळें तो जिवाजीला मारतो.

[अपूर्ण]

कै. गडकरी यांच्या एका निकटच्या आप्तांकडून मिळालेली

राम गणेश गडकरी यांची जन्मपत्रिका

जन्म शके १८०७ ज्येष्ठ शुद्ध १३ मंगळवार दुपारी १२ वाजता.

जन्मस्थळ नवसारी

ता. २६ मे १८८५

जन्मांग



# नांवांची सूची

